1631

॥ श्रीराम ॥

# भक्तिमार्गप्रदीप.



भावें करितां माझी भक्ती । विषयवासना जळोनि जाती ।
निर्विकल्प उपजे शांती । माझे भक्तिपंथीं चालतां ॥ १ ॥
धन्य नरदेहाची प्राप्ती । धन्य साधूंची संगती ।
धन्य धन्य ते भावार्थी । जे भगवद्भक्तीं रंगले ॥ २ ॥

—श्रीएकनाथ.

संपादक व प्रकाशक

लक्ष्मण रामचंद्र पांगारकर, बी. ए.

पुणें, मुमुक्षु कचेरी.

मुद्रक - बाळकृष्ण विष्णु साठे.

पुणे "यशवंत" प्रेस.

आवृत्ति चवथी.

वर्षप्रतिपदा शके १८३२-सन १९१०.

किंमत ४ आणे.

# उपोद्घात.

मोक्षपदें तुच्छ केलीं या कारणें । आह्मां जन्म घेणें युगायुगीं ॥ १ ॥
विठ्ठे ऐसें सुख नव्हे भक्तिरस । पुढती पुढती आस सेवावें हें ॥ २ ॥
देवाहातीं रूप धरवें आकार । नेदं निराकार होवूं त्यासी ॥ ३ ॥
तुका ह्मणे चित्त निवांत राहिलें । पाईं तीं पाउलें विटेवरी ॥ ४ ॥

१ भरतखंड ही पुण्यभूमि आहे. या भूमीत ईश्वराचे व ईश्वराच्या परम भक्तांचे अनेक अवतार युगायुगाचे ठायीं झाले आहेत. आत्मस्वरूपाचें दर्शन, श्रवण, मनन व निदिध्यासन होऊन कृतार्थ होण्याचा मार्ग आपल्या प्राचीन महर्षींना घालून दिला व त्या मार्गानें जाऊन असंख्य पुण्यवंत जीव धन्य झाले. कांहींनीं आपापले अनुभव लिहून ठेविले आहेत. आपले अनादि वेदग्रंथ, आत्मतत्त्वाचें उत्कृष्ट निरूपण करणारे उपनिषद्ग्रंथ, श्रीकृष्णासारख्या परमात्म्याच्या व्यक्त रूपाविषयी अढळ प्रेम उत्पन्न करणारे गीताभागवतादि भक्तिप्रधान ग्रंथ व यांच्या माहात्म्यानें व सद्गुरुप्रसादानें कृतार्थ झालेल्या भागवतांच्या स्वानुभवपर उक्ति, अमित जीवांना मुक्त होण्याचा मार्ग दाखविण्यास कारण झाल्या आहेत. अर्वाचीन काळींही महाराष्ट्रांत असे अनेक ब्रह्मनिष्ठ भगवद्भक्त होऊन गेले. 'श्रीज्ञानराजें केला उपकार । मार्ग हा निर्धार दाखविला' या नाना महात्म्यांच्या उक्तीप्रमाणें त्यांत श्रीज्ञानेश्वर हे अग्रगण्य होत. श्रीज्ञानेश्वर, श्रीनामदेव, श्रीएकनाथ, श्रीतुकाराम व श्रीरामदास हे महाराष्ट्रसाधुपंचायतन होय. यांनी व यांच्याच अधिकाराच्या इतर महापुरुषांनीं **ज्ञानयोग व कर्मयोग यांशीं अविरुद्ध अशा भक्तिमार्गाचा** महाराष्ट्रभर प्रसार केला. ज्ञानेश्वरी ही पुढील ६०० वर्षांत झालेल्या संतांची आई आहे. ज्ञानेश्वरी व एकनाथी भागवत हे भक्तिमार्गाचे आधारस्तंभ होत. पुढील बहुतेक संतांना यापासून प्रेरणा झाली आहे. ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, प्रपंचपरमार्थाचें उत्कृष्ट विवरण करणारा दासबोध व नामदेवतुकारामादि प्रेमळ भक्तांचे स्वैरालाप–हे अमृताचे डोह आहेत. यांत शुद्ध भावानें नित्य मज्जन करणारा पुरुष

गतकल्मष होऊन धन्य होईल यांत तिळमात्र शंका नाहीं. उपास्याचें नांव निराळें असलें तरी सर्व उपास्यें एकरूपच आहेत. नरहरिसोनारांचा शिव, नामदेवाचा विठ्ठल, रामदासांचा राम, एकनाथांचा दत्त हे सर्व एकच आहेत. सर्व संतही ' साधु दिसती वेगळाले । परी ते स्वस्वरूपीं मिळाले । अवघे मिळोनि एकचि झाले । देहातीत वस्तु ' ह्या समर्थोक्तीप्रमाणें एकरूपच आहेत सर्व संत 'आत्मानुभवानें चोखाळलेले' आहेत ह्या **संतांनीं** जडजीवाच्या उद्धारामार्टी अत्यंत सुलभ व सर्वमान्य असा ईश्वरप्राप्तीचा निश्चित उपाय **भक्तिमार्ग** हा घालून दिला आहे. कोणत्याही वर्णाच्या, कोणत्याही आश्रमांतल्या स्त्रीला अगर पुरुषाला तो मोकळा आहे. प्रपंचत्यागाचें कारण नाहीं, वासनात्याग हाच खरा संन्यास आहे आपापले व्यवसाय करीत असतां जीवानें परब्रह्मीं चित्त ठेवून मुखानें नित्य नामस्मरण करीत असावें म्हणजे सद्गुरूची कृपा होऊन तो कृतार्थ होईल ' अवघी एकाचीच वाण । तेथें कैचें भिन्नाभिन्न ' हें तत्त्व ओळखून समभावानें सर्व भूतांशीं वागावें आपापले जातिधर्म व कुळधर्म पाळून, सर्व कर्म कर्तव्य म्हणून अहेतुक चित्तानें करून भगवंताला अर्पावें. व मोक्षाची इच्छा न करितां श्रीनारदाप्रमाणें भगवंताचे गुण गात प्रेमानें ईश्वराला स्ववश करावें **हा मुख्य भागवतधर्म** आहे. हाच **भक्तिमार्ग** आहे. मराठी साधुसंतांनी याच गोष्टी आपल्या अमृतवाणीनें परोपरीनें सांगितल्या आहेत.

२ इंग्रजी शिक्षणाच्या संगतीनें माझ्या मनावर जडवादाचा पगडा किंचित्काल बसला होता, पण हा भ्रमनिरास होण्यास मराठी कविताच मुख्यत: कारण झाली. वडिलांच्या पुण्याईनें व त्यांच्या सच्चरित्रावलोकनानें मला दहा बारा वर्षांमागें मराठी कवितेची गोडी लागली व या अवधींत माझे परमभाग्याचे व आनंदाचे जे क्षण गेले ते संतवचनामृतपान करण्यांत जे गेले तेच होत. माझें चित्त मराठी कवितेंत रंगलें आहे तें तेथेंच सर्वकाळ रंगो व तुच्छ विषयांचें आणि लटक्या व्यवहाराचें वर्णन करणाऱ्या ग्रंथांकडे न मुरडो अशी माझी ईश्वराजवळ प्रार्थना आहे. संतवचनांचें सामर्थ्य अद्भुत आहे. अनेक क्षुद्र विकारांना व तुच्छ विषय-

बुद्धीला दटावण्याचें सामर्थ्य संतवचनांत आहे; चित्ताची शुद्धि करून तें ईश्वराकडे वळविण्याचे सामर्थ्य संतवचनांत आहे; जीवाचें जीवपण मोडून त्याला ब्रह्मपदीं बसविण्याचें व स्वानंदानें नाचविण्याचे सामर्थ्य संतवचनांत आहे. संतवचनांत रंगणारें चित्त पावन होऊन आनंदानें डोलूं लागलें कीं, 'काय या संताचे मानूं उपकार । मज निरंतर जागवीती' हा तुकोबांचा गोड अभंग आठवून कृतज्ञतेनें हृदय भरून येतें. श्रीज्ञानेश्वरतुकारामादि संतांच्या वचनांत रमणारें हें चित्त त्यांच्याच प्रसादानें परमात्म्याच्या स्वरूपांत निरंतर रंगो, अशी त्या दयाघनापाशीं माझी अहर्निश प्रार्थना आहे

३ प्रस्तुत काळीं धर्मजागृति होऊं पहात आहे. सर्व प्रकारच्या आपत्तींतून तारणारा एक धर्म आहे. आचार आणि श्रद्धा या दोघांची संगति कायम ठेविली तरच धर्मोत्कर्ष होतो, विधिवशात प्राप्त झालेल्या स्थितींत निरंतर ईश्वर ध्यान व नामस्मरण करीत राहिल्यास चित्तशुद्धि होते व प्राणी ईश्वरीप्रसादाला पात्र होतो. ईश्वरी प्रसादाशिवाय जन्म निष्फळ होय. या सर्वांला साक्षभूत होणारी संतांची वचनें आहेत. 'काही पाठ केली संतांची उत्तरें । विश्वासें आदरें करोनियां' असें तुकोबारायही सांगतात. मराठी कवितेतला बराचसा उत्कृष्ट भाग प्रस्तुत वेच्यांत आला आहे. प्रातःस्मरण, ईश्वरस्तुति, नाममाहात्म्य, सद्गुरुस्तव, संतमाहात्म्य व वरप्रसाद असे प्रस्तुत पुस्तकाचे सहा भाग केले आहेत व प्रत्येक भागांत मराठी कवितेतले उत्कृष्ट उतारे दिले आहेत ज्ञानेश्वरी, एकनाथी भागवत, दासबोध वगैरे मोठमोठे ग्रंथ नित्य वाचनांत ठेवून प्रभातकाळीं किंवा रात्रीं शुचिर्भूत होऊन देवासमोर बसून, शुद्ध भावानें या पुस्तकांतले वेंचे म्हणावेत. अखेरीस 'अमृतबिंदु' म्हणून एक प्रकरण घातलें आहे, ज्ञानेश्वर, तुकाराम व रामदास यांच्या ग्रंथांतले थोडक्या शब्दांत पुष्कळ अर्थ मनांत भरविणारे उत्कृष्ट सिद्धांत त्यांत दिले आहेत. प्रत्येक सिद्धांत म्हणजे एक व्याख्यान आहे. संतांचें एक वचन म्हणजे एक मूकव्याख्यान

असतें. आईबापांनीं किंवा पालकांनीं हें पुस्तक आपापल्या मुलांमुलींचे हातीं देऊन त्यांच्यासह ईशप्रार्थना करावी म्हणजे स्वतःचें हित साधून मुलांस चांगले वळण लागेल. पहांटेच्या भूपाळ्या, रात्रीच्या आरत्या, नित्यपाठ वगैरेंचा मनावर सात्विक संस्कार होऊन मन भक्तिमार्गाकडे वळते. हा जुना सांप्रदाय दुर्दैवाने उत्तरोत्तर मोडत चालला आहे, व म्हणून तर असे पुस्तक छापून प्रसिद्ध करणें अवश्य वाटले. शाळांतूनही मुलांस धर्मशिक्षण देण्यास प्रस्तुत पुस्तकाचा चांगला उपयोग होईल. प्रस्तुत पुस्तक आबालवृद्धांचीं मनें सश्रद्ध करून भक्तिमार्गाकडे वळविण्यास साधनभूत होवो अशी त्या दयाघनाची प्रार्थना करून पुरे करितो.

## चवथ्या आवृत्तीची प्रस्तावना.

गेल्या पांच वर्षांत '**भक्तिमार्गप्रदीपा**'च्या तीन आवृत्त्या संपून चौथ्या आवृत्तीचा योग परमेश्वराने आणला याबद्दल त्याचे प्रथम सप्रेम स्मरण करितो. पहिली आवृत्ति ३ महिन्यांत उडाली व दुसरी १० हजारांची आवृत्ति तीन वर्षांत खलास झाली. जुनी बाडें व सांप्रदायिक पद्धती यांचा यांत आदर केला आहे. भक्तिमार्गप्रदीपानंतर असे ५।६ निरनिराळे 'प्रदीप' निघाले ही गोष्ट सदर ग्रंथाच्या लोकप्रियतेची निदर्शक आहे. प्रदीप कोठें शाळांतून धर्मशिक्षणासाठीं शिकविला जात आहे, कोठें बक्षिसपुस्तकांत विद्यार्थ्यांना वाटला जात आहे, भाऊबिजेला कांहीं विद्यार्थ्यांनीं आपल्या बहिणींना तो 'ओवाळणी' घातला आहे व गुदस्ता एका सुशिक्षित कुलवधूने त्याच्या १०८ प्रती नितक्याच विद्यार्थ्यांना वाचन म्हणून वाटून प्रत्येक प्रतीला ८४ आणे आणखी दक्षिणा दिल्याचें मला कळलें आहे! प्रदीप महाराष्ट्राला आवडला असून त्याचा प्रकाश केटा व आफ्रिका येथपर्यंत पसरला आहे. असो; नव्या जुन्या स्त्रीपुरुषांनीं व अलीकडे तरुणांनीही 'प्रदीप' हातीं घेऊन 'स्वसुखनिधान' शोधण्यास आरंभ केला आहे व राष्ट्रांत भगवद्भक्ति वाढविण्याच्या कामीं प्रदीपाचा चांगला उप-

योग होत आहे हें पाहून मला समाधान वाटतें. प्रदीपांत माझें असें काय आहे ? साधुसंतांचीच ती कृति आहे. साधुसंतांनीं भूतदयेनें प्रेरित होऊन तयार केलेलीं ती पक्वान्नें आहेत; व त्याचा सुवास सर्वेंद्रियांना वेडावणारा आहे असा अनुभव आल्यामुळें मी वाढण्याचें काम स्वसुखार्थ पत्करिलें आहे! सदर आवृत्तींत १६ पृष्ठें मजकूर ज्यास्त घातला असून किंमत पूर्वीचीच कायम ठेविली आहे. पहिली आवृत्ति ८० पृष्ठांची होती तिचा विस्तार १४४ पृष्ठांचा झाला आहे!

वर्षप्रतिपदा, शके १८३२ } लक्ष्मण रामचंद्र पांगारकर.
पुणें, मुमुक्षु कचेरी }

# विषयोपन्यास.

**१ प्रातःस्मरण** ( १-३४ ) या ३४ पृष्ठांच्या पहिल्या प्रकरणांत नित्य-पाठांत असलेले '**प्रातःस्मरणाचे श्लोक**' प्रथम दिले असून पुढें ११ उत्कृष्ट '**भूपाळ्या**' दिल्या आहेत व नंतर शिवरामस्वामींचें भूपाळीपंचक तात्पर्यासह दिलें आहे. मराठांत निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ व तुकाराम यांचें हरिपाठ फार प्रसिद्ध आहेत, म्हणून त्यांतून निवडक १५ '**हरिपाठाचे अभंग**' त्यापुढें दिले आहेत. शेवटीं काकडआरत्या, साध्या पण प्रसिद्ध आरत्या, धांवा, पाळणा, प्रदक्षिणा, विडे, शेजारत्या व उपसंहाराचे श्लोक '**सकाळ संध्याकाळच्या आरत्या**' या सदराखालीं दिले आहेत.

**२ ईश्वरस्तुति** ( ३६-८८ ) या दुसऱ्या प्रकरणांत प्रथम सहा करुणाष्टकें दिलीं असून त्यांपैकीं ५ समर्थांचीं आहेत. पुढें श्रीज्ञानेश्वर, नामदेव, जनाबाई, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि संतांच्या गाथ्यांतले ईश्वरस्तवनपर असे निवडक ७४ अभंग दिले असून पुढें मराठींतलीं उत्तमोत्तम व लोकप्रिय अशीं ३१ पदें दिलीं आहेत. वरप्रसाद या सदराखालीं देवापाशीं भक्तानें काय मागावें तें संतवाणीनेंच मागितलें आहे; व शेवटीं भगवत्प्र-

साद झाल्यानंतर भक्ताला वाटणाऱ्या **धन्यतेचे** चार उद्गार दिले आहेत. हीं पहिलीं ८८ पृष्ठें भक्तिप्रेमानंदवर्धक आहेत.

**३ सद्गुरुस्तव** ( ८९-९६ ) यांत गुरुभक्तिसुख चाखणाऱ्या प्रेमळांना आनंदविणारे **अभंग** व **पदें** दिलीं असून शिवाय नारायणस्वामींचे **गुरुपादुकाष्टक** व निरंजनमाधवाचें **सद्गुरुस्तोत्र** दिले आहे. सद्गुरु व परमात्मा एकच आहेत हे गुह्य संतांनीं यांत प्रकट केले आहे

**४ संतमाहात्म्य** ( ९७-१०६ ) परमात्मरूप झालेल्या संतांची महती यांत अंगे संत झालेल्या व सत्संगसुख चाखलेल्या संतांनीच **अभंग** व **पदें** यांतून वर्णिली आहे.

**५ नामसंकीर्तन** ( १०७-११६ ) कलियुगांत हरिपदप्राप्तीचे मुख्य साधन 'नामसंकीर्तन' हेच होय असे सर्व संतांनीं निश्चयानें व एक मतानें सांगितले आहे. त्या सर्वांनीं स्वानुभवाचा दाखला देऊन **नामस्मरणाची** साधनमुख्यता कशी वर्णिली आहे ते यांतील ठळक अभंगावरून समजणार आहे

**६ परमार्थविचार** ( ११७-१२८ ) प्रपंचाचें रूप काय आहे, परमार्थ ठसण्याकरितां प्रपंचांत वागावे कसें, मन आवरावे कसें, गृहस्थाश्रमांत असूनही परमार्थ साधावा कसा इत्यादिकांचा **रात्रीच्या एकांतसमयीं आपल्याशींच निश्चयात्मक विचार** करिता यावा या हेतूनें **प्रपंचाची असारता**, नारायणस्वामीकृत **सुविचारमाला**, श्रीसमर्थकृत **मनोबोधांतील निवडक श्लोक**, श्रीज्ञानेश्वरांनीं **गृहस्थधर्माचा** केलेला उपदेश हे प्रकार सदर प्रकरणांत दिले आहेत.

**७ अमृतबिंदु** ( १२९-१३६ ) ज्ञानेश्वरी, तुकोबारायांची गाथा, दासबोध व समर्थांचे इतर ग्रंथ यांतून विखुरलेल्या बिनमोल सिद्धांताचे जातां येतां सर्वकार्य करीत असतांना मनन व्हावें व ते मनन होतां होतां आपले अमृतत्व आपणांस प्रतीत व्हावें या हेतूनें हे अमृतबिंदु एकत्र केले आहेत.

# भक्तिमार्गप्रदीप.

## १ प्रातःस्मरण.

उठा सकळ जन उठले नारायण । आनंदले मुनिजन तिन्ही लोक ॥ १ ॥
करा जयजयकार वाद्याचा गजर । मृदंग विणे अपार टाळ घोळ ॥ २ ॥
जोडोनीया कर मुख पहा सादर । पायावरी शीर ठेवोनीयां ॥ ३ ॥
**तुका** ह्मणे काय पढियेंते मागा । आपुलालें सांगा दुःख सकळ ॥ ४ ॥

## १ मंगलाचरण.

श्रीगणेशायनमः । श्रीसरस्वत्यैनमः । श्रीगुरुभ्योनमः । श्रीवेदपुरुषायनम. । इष्टदेवताभ्योनमः । कुलदेवताभ्योनमः । श्रीलक्ष्मीनारायणाभ्यांनमः । श्रीउमामहेश्वराभ्यानमः । श्रीमातापितृभ्योनमः ।

**करदर्शन व भूमिवंदन.**

कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती ।
करमूले तु गोविंदः प्रभाते करदर्शनम् ॥ १ ॥
समुद्रवसने देवि पर्वतस्तनमंडले ।
विष्णुपत्नि नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे ॥ २ ॥

**मुखमार्जनानंतर.**

वक्रतुंड महाकाय सूर्यकोटिसमप्रभ ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा ॥ ३ ॥

गणनाथसरस्वतीरविशुक्रबृहस्पतीन् ।
पंचैतान्संस्मरेन्नित्यं वेदवाणीप्रवृत्तये ॥ ४ ॥
गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णुर्गुरुर्देवो महेश्वरः
गुरुःसाक्षात्परब्रह्म तस्मै श्रीगुरवे नमः ॥ ५ ॥
ब्रह्मानंदं परमसुखदं केवलं ज्ञानमूर्तिं
द्वंद्वातीतं गगनसदृशं तत्वमस्यादिलक्ष्यम् ।
एकं नित्यं विमलमचलं सर्वधीसाक्षिभूतं
भावातीतं त्रिगुणरहितं सद्गुरुं तं नमामि ॥ ६ ॥
शांताकारं भुजगशयनं पद्मनाभं सुरेशं
विश्वाधारं गगनसदृशं मेघवर्णं शुभांगम् ।
लक्ष्मीकांतं कमलनयनं योगिभिर्ध्यानगम्यं
वंदे विष्णुं भवभयहरं सर्वलोकैकनाथम् ॥ ७ ।
मूकं करोति वाचालं पंगुं लंघयते गिरिम् ।
यत्कृपा तमहं वंदे परमानंदमाधवम् ॥ ८ ॥
हे जिव्हे रससारज्ञे सर्वदा मधुरप्रिये ।
नारायणाख्यपीयूषं पिब जिव्हे निरंतरम् ॥ ९ ॥
पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिरः ।
पुण्यश्लोको विदेहश्च पुण्यश्लोको जनार्दनः ॥ १० ॥
अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च बिभीषणः ।
कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥ ११ ॥

बलिर्बिभीषणो भीष्मःप्रह्लादो नारदो ध्रुवः ।
षडेते वैष्णवास्तेषां स्मरणं पापनाशनम् ॥ १२ ॥
अहल्या द्रौपदी सीता तारा मंदोदरी तथा ।
पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥ १३ ॥
अयोध्या मथुरा माया काशी कांची अवंतिका ।
पुरी द्वारावती चैव सप्तैते मोक्षदायकाः ॥ १४ ॥
गागं वारि मनोहारि मुरारिचरणच्युतम् ।
त्रिपुरारिशिरश्चारि पापहारि पुनातु माम् ॥ १५ ॥
धर्मो विवर्धति युधिष्ठिरकीर्तनेन ।
पापं प्रणश्यति वृकोदरकीर्तनेन ॥
शत्रुर्विनश्यति धनंजयकीर्तनेन ।
माद्रीसुतौ कथयतां न भवन्ति रोगाः ॥ १६ ॥
ब्रह्मा मुरारिस्त्रिपुरांतकारी भानुःशशी भूमिसुतो बुधश्च ।
गुरुश्च शुक्रः शनिराहुकेतवः कुर्वन्तु सर्वे मम सुप्रभातम् ॥१७॥
न वासुदेवभक्तानामशुभं विद्यते क्वचित् ।
जन्म मृत्यु जरा व्याधिर्भयं नैवोपजायते ॥ १८ ॥
रामाय रामभद्राय रामचंद्राय वेधसे ।
रघुनाथाय नाथाय सीतायाः पतये नमः ॥ १९ ॥
कृष्णाय वासुदेवाय हरये परमात्मने ।
प्रणतक्लेशनाशाय गोविंदाय नमो नमः ॥ २० ॥

नमो ब्रह्मण्यदेवाय गोब्राह्मणहिताय च ।
जगद्धिताय कृष्णाय गोविंदाय नमो नमः ॥ २१ ॥
मंगलं भगवान्विष्णुर्मंगलं गरुडध्वजः ।
मंगलं पुंडरीकाक्षो मंगलायतनं हरिः ॥ २२ ॥

## २ भूपाळ्या.

### १ भूपाळी गणपतीची.

उठा उठा हो सकळिक वाचे स्मरावा गजमुख ।
ऋद्धिसिद्धीचा नायक सुखदायक भक्तांसीं । सु. दासासीं ॥ ध्रु.॥
अंगीं शेंदुराची उटी, माथां शोभतसे किरिटी ।
केशरकस्तुरी ललाटी, कंठीं हार साजिरा ॥ १ ॥
कानीं कुंडलाची प्रभा, चंद्रसूर्य जैसी नभा ।
मोंजीं नागबंदी शोभा, स्मरतां उभा जवळी तो ॥ २ ॥
कांसे पितांबराची धटी, हाती मोदकाची वाटी ।
रामानंद स्मरतां कंठीं, तो संकटीं पावतो ॥ ३ ॥

### २ भूपाळी रामाची.

उठोनियां प्रातःकाळीं । जपा रामनामावळीं ।
स्वयें ध्यातो चंद्रमौळी । शैलबाळीसमवेत ॥ ध्रु. ॥

१ कटीचे ठायीं; जसें; 'मौंजी वेष्टित वल्कलें' आनंदतनय. २ नागाकृति कटिभूषण. ३ रेशमी वस्त्र. ४ शंकर. ५ पार्वतीसह.

राम योग्यांचें मंडण । राम भक्तांचें भूषण ।
राम धर्माचें रक्षण । संरक्षण दासांचें ॥ १ ॥

रामें ताटिका मारिली । रामें शिळा उद्धारिली ।
रामें जानकी पर्णिली । गणिका केली ते मुक्त ॥ २ ॥

रामें पाषाण तारिले । रामें दैत्य संहारिले ।
रामें बंदी सोडविले । मुक्त केले सुरवर ॥ ३ ॥

रामें रक्षिलें भक्तांसी । रामें सोडविलें देवांसी ।
राम दासाचे मानसीं । रामदासीं आनंद ॥ ४ ॥

### ३ प्रभाती रामाची

जागिये रघुनाथकुंवर । पक्षी बन बोले ॥ टेक ॥
चंद्रकिरण शीतल भई[1] । चकेई[2] पियमिलन[3] गई ।
त्रिविध मंद चलत पवन । पल्लव द्रुम डोले ॥ १ ॥
प्रात भानु प्रकट भयो । रजनीको तिमिर गयो ।
भृंग करत गुंजगान । कमलवदन खोले[4] ॥ २ ॥
ब्रह्मादिक धरत ध्यान । सुरनरमुनि करत गान ।
जागनकी बेर[5] भई । नयनपलक खोले ॥ ३ ॥
तुलसिदास अतिअनंद । निरखि कै मुखारविंद ।
दीननको देत दान । भूषण बहु मोले ॥ ४ ॥

---

१ झाले. २ चक्रवाकी. ३ प्रियाशीं संगत. ४ उघडा. ५ वेळ.

### ४ भूपाळी पंढरीची

उठा उठा हो वेगेंसीं । चला जाऊं पंढरिसीं ।
भेटों विठ्ठलरखुमाईसी । त्रिविध ताप हरतील ॥ ध्रु० ॥
चंद्रभागे करूं स्नान । घेऊं पुंडलिकाचें दर्शन ।
तेथें भेटति संतजन । तेणें मन निवेल ॥ १ ॥
गंगा यमुना सरस्वती । कृष्णा वेण्या भागीरथी ।
तुंगभद्रा भोगावती । येती श्रीपतिदर्शना ॥ २ ॥
तापी नर्मदा कावेरी । पंचगंगा गोदावरी ।
स्नानें केलिया बो¹हरी । महादोष हरतील ॥ ३ ॥
रामानंदाचें माहेर । क्षेत्र नाम पंढरपूर ।
माता पिता विश्वंभर । पैलपार तरतील ॥ ४ ॥

### ५ भूपाळी कृष्णाची.

जाग रे जाग बापा! विश्वपालका कृष्णा! ।
दीन आम्ही उभे द्वारीं, आमची बोळवी तृष्णा ॥ ध्रु० ॥
त्रासलों प्रपंचीं या, बहु कष्टलों भारी ।
म्हणउनि शरण आलों विभो! तुझिया द्वारीं ॥ जाग० ॥ १ ॥
सांग बा! न्यून काय हरि! तुझिया भांडारीं ।
याचक भीक मागे प्रेम देईं झडकरी ॥ जाग० ॥ २ ॥
गुरुकृपे उदयो झाला हरि उदया आला ।
सुख तें काय सांगूं जिवलग भेटला ॥ जाग० ॥ ३ ॥

---

१ ओढ्यानें, ओहरानें. २ वयबी.

श्रीगुरुनाथ राया कृपासिंधु गोविंदा ।
देवनाथ प्रार्थिताहे प्रभुपदारविंदा ॥ जाग० ॥ ४ ॥

६ भूपाळी श्रीकृष्णाची.

ऊठ गोपाळजी! जाय धेनूंकडे । पाहती सौंगडे[1] वाट तूझी ॥ ध्रु ॥
लोपली हे निशी मंद झाला शशी । मुनिजन मानसीं ध्याति तुजला १
भानु उदयाचळीं तेज पुंजाळलें । विकसती कमळें जळामाजी ॥ २ ॥
धेनुवत्सें तुला बाहती[2] माधवा! । ऊठ गा यादवा! उशिर जाला ३
ऊठ पुरुषोत्तमा! वाट पाहे रमा । दावि मुखचंद्रमा सकळिकांसी ॥ ४ ॥
कनकपत्रांतरीं दीपरत्नें बरीं । ओवाळिती सुंदरी तूजलागी ॥ ५ ॥
जन्मजन्मांतरीं दास होऊं हरी । बोलती वैखरी भक्त तूझे ॥ ६ ॥
कृष्णकेशव करी चरणांबुज धरी । ऊठ गा श्रीहरी मायबापा ॥ ७ ॥

७ भूपाळी संतांची.

उठि उठि बा पुरुषोत्तमा । भक्तकामकल्पद्रुमा ।
आत्मारामा निजसुखधामा । मेघःशामा श्रीकृष्णा ॥ ध्रु ॥
भक्तमंडळी महाद्वारीं । उभी तिष्ठत श्रीहरी ।
जोडोनियां दोन्हीं करीं । तुज मुरारी पहावया ॥ १ ॥
संत सनकादिक नारद । व्यास वाल्मिक ध्रुव प्रल्हाद ।
पार्थ पराशर रुक्मांगद । हनुमान अंगद बळिराजा ॥ २ ॥
झाला प्रातःकाळ पूर्ण । करीं पंचांगश्रवण ।
आला मुद्गलभट ब्राह्मण । आशीर्वचन घे त्याचें ॥ ३ ॥

---

१ खेळगडी. २ बोलावतात.

तुझा नामदेव शिंपी । घेउनि आला आंगीटोपी ।
आतां जाऊं नको बा झोंपी । दर्शन देई निजभक्तां ॥ ४ ॥
नानापरींचे अळंकार । घेउनि आला नरहरिसोनार ।
आला रोहिदास चांभार । जोडा घेउनि तुजलागीं ॥ ५ ॥
सुगंधसुमनें पुष्पांजुळी । घेउनि आला सांवतामाळी ।
म्हणे श्रीहरिपदकमळीं । अनन्यभावें समर्पूं ॥ ६ ॥
कान्हूपात्रा नृत्य करी । टाळछंदें साक्षात्कारी ।
सेना न्हावी दर्पण करीं । घेउनि उभा राहिला ॥ ७ ॥
लिंबुर[1] हुरडा[2] घेउनि आला । तो हा माणकोजि बोधला ।
दर्शन द्यावें बा त्याजला । भक्त भोळा म्हणऊनी ॥ ८ ॥
मिराबाई तुझे साठीं । दूध-तूप भरुनी वाटी ।
तुझ लावावया ओठीं । लक्ष लाउनि बैसली ॥ ९ ॥
नामदेवाची जनी दासी । घेउनि आली तेलतुपासी ।
तुज न्हाऊ घालण्यासी । उभी ठेली महाद्वारीं ॥ १० ॥
गुळखोबरें भरुनी गोणी । घेउनि आला तुकयावाणी ।
वह्या राखिल्या कोरडया पाणीं । भिजों दिल्या नाहीं त्वां ॥ ११
आला चोखामेळा महार । स्वामी करीतसे जोहार ।
त्याचा करोनियां उद्धार । संतमेळीं स्थापिला ॥ १२ ॥
हरिभजनाविण वायां गेले । ते नरदेहीं बैल झाले ।
गोऱ्याकुंभारें आणिलें । खेळावया तुजलागीं ॥ १३ ॥

---

१ बाजरीच्या कणसांचा हुरडा. २ जोंधळयाचा हुरडा.

गरूडपारीं हरिरंगणीं । टाळमृदंगाचा ध्वनी ।
महाद्वारीं हरिकीर्तनीं । तल्लिन कान्हा हरिदास ॥ १४ ॥
निजानंदें रंगे पूर्ण । सर्वेही कर्मे कृष्णार्पण ।
श्रीरंगा निजतनु अर्पण । चरणसेवा करीतसे ॥ १५ ॥

८ भूपाळी गंगेची.

उठोनियां प्रातःकाळीं । वदनीं वदा चंद्रमौळी[१] ।
श्रीबिंदुमाधवाजवळी । स्नान करा गंगेचें । स्नान करा गोदेचें[२] ॥ ध्रु. ।
स्नानदान जया अंतरीं । घडेल भागिरथीच्या तीरीं ।
हरि कृपा करिल त्यावरी । ऐसें महात्म्य गंगेचें (गोदेचें) ॥ १ ॥
भागीरथिचें स्नान करा । हृदयीं स्मरोनि गंगाधरा ।
चुकेल चौऱ्यायशीचा फेरा । ऐसें महात्म्य गंगेचें ॥ २ ॥
गंगा आहे स्वर्गावरती । पाताळीं ते भोगावती ।
मृत्युलोकीं हे विख्याती । ऐसें महात्म्य[३] गंगेचें ॥ ३ ॥
कृष्णा वेण्या तुंगभद्रा । शरयू कालिंदी नर्मदा ।
भीमा भामा मुख्य गोदा । करा स्नान गंगेचें ॥ ४ ॥
व्यास वाल्मीकि नारदमुनी । अत्री वसिष्ठ आणि जैमिनी ।
गुरु दत्त येति माध्यान्हीं । ऐसें महात्म्य[४] गंगेचें ॥ ५ ॥
आली आषाढिएकादशी । चला जाऊं पंढरिसी ।
पांडुरंग चरणापाशीं । दावी महात्म्य गंगेचें ॥ ६ ॥

---

१ शंकर. २ गोदावरी ही दक्षिणेंतली गंगाच आहे. ३ म्हणूनच तिला 'त्रिपथगा' म्हणतात. ४ तीर्थे व संतऋषिमुनि यांचें साहचर्य आहे.

### ९ भूपाळी घनश्याम श्रीधराची.

घनश्यामसुंदरा श्रीधरा अरुणोदय झाला ।
उठिं लवकरि वनमाळी ! उदयाचळीं मित्र आला ॥ ध्रु० ॥
सायंकाळीं एके मेळीं द्विजगण अवघे वृक्षीं ।
अरुणोदय होतांचि उडाले चरावया पक्षी ॥
अघमर्षणादि[1] करुनि तापसी तपाचरण–दक्षी ।
प्रभातकाळीं उठुनि कापडी[2] तीर्थपंथ लक्षी ॥
करुनि सडासंमार्जन गोपी कुंभ घेउनि कुक्षीं ।
यमुनाजळासि जाति मुकुंदा ! दध्योदन[3] भक्षीं ॥
मुक्तता होउं पाहे । कमळिणीपासुनियां भ्रमरा ।
पूर्वदिशे मुख धुतलें । होतसे नाश तिमिरा ।
उठिं लवकरि गोविंदा सांवळ्या नंदकुमरा ।
मुखप्रक्षालन करीं अंगिकारीं भाकरकाला ॥ १ ॥
घरोघरीं दीप अखंड त्यांच्या सरसावुनि वाती ।
गीत गाति सप्रेमें गोपी सदना येति जाती ॥
प्रवर्तोनि गृहकामीं रंगावळि घालूं पाहती ।
आनंदकंदा ! प्रभात झाली उठ सरली राती ॥
काढीं धार क्षीरपात्रीं घेउनी धेनू हंबरती ।
दारिं उभे गोपाळ तुजला हांक मारुनि पाहती ।

---

१ पापनाशक स्तोत्रें म्हणणें वगैरे. २ यात्रेकरू. ३ दहींपोहे. ४ इंद्रियांचा नियामक.

हे सुमनहार कंठीं । घालिं या गुंजमाळा ।
हातीं वेत्रकाष्ठ बरवें । कांबळा घेई काळा ॥
ममात्मजा मधुसुदना हृषीकेशि जगत्पाळा ।
हंबरताति वासरें, धेनु स्तन–पान्हा आला ॥ २ ॥
प्रातःस्नानें करुनि गोपिका अलंकारें नटती ।
कुंकुमादि चर्चुनी मंथनालागिं आरंभीती ॥
प्रेमभरित अंतरांत वदनीं नामावळि गाती ।
अर्घ्यदान देउनियां द्विजजन देवार्चन करिती ॥
नेमनिष्ठ वैष्णव ते विष्णु–पूजा समर्पिती ।
स्मार्त शिवार्चनसक्त शक्तिनें शाक्त आराधीती ॥
ऋषिगण आश्रमवासी । जे निरंजनीं धाले ।
अरुणोदय होतांचि । आपुले ध्यानिं मग्न झाले ॥
पंचपंच–उषःकालीं । रविचक्र निघों आलें ।
येवढा वेळ निजलासि म्हणुनि हारे कळेल नंदाला ॥ ३ ॥
विद्यार्थी विद्याभ्यासास्तव सादर गुरुपायीं ।
अध्यापन गुरु करिति शिष्यही अध्ययना उदयीं ॥
याज्ञिकजन यज्ञकुंडिं आहुती टाकिताति पाहीं ।
रविप्रभा पडुनियां उजळल्या शुद्ध दिशा दाही ॥
हे माझे सांवळे पाडसे । उठिं कृष्णाबाई ।
सिद्ध सर्वे बळिराम घेउनि । गोधनें वना जाई ॥

मुनिजनमानसहंसा । गोपीमनःकमलभृंगा ।
मुरहर पंकजपाणी । पद्मनाभ श्रीरंगा ॥
शकटांतक सर्वेशा । हे हरि प्रतापतुंगा ॥
कोटिरवींहुनि तेज आगळें तुझिया वदनाला ।
**होनाजी–बाळा** नित्य ध्यातसे हृदयिं नाममाळा ॥ ४ ॥

१९ भूपाळी आत्मारामाची.

उठा प्रातःकाळ झाला । आत्माराम पाहूं चला ।
हा समयो जरि टळला । तरि अंतरला श्रीराम ॥ ध्रु० ॥
जीवशिव दोघेजण । भरत आणि शत्रुघन ।
आला बंधु लक्ष्मण । मन उन्मन होऊनी ॥ १ ॥
विवेक वसिष्ठ सद्गुरु । संतसज्जनमुनीश्वरू ।
करिती नामाचा गजरू । हर्षनिर्भर होउनियां ॥ २ ॥
सात्विक सुमंत प्रधान । नगरवासी अवघे जन ।
आला वायूचा नंदन । श्रीचरण पहावया ॥ ३ ॥
माता जानकी विघडली[२] । होती प्रारब्धें लिहिली ।
तिची देहबुद्धि जाळिली । आलिंगिली श्रीरामें ॥ ४ ॥
आजचि दिवाळी दसरा । पर्वकाळ आला घरा ।
**रामानंदाच्या** दातारा । भेटी माहेरा मज द्यावी ॥ ५ ॥

---

१ सदर अप्रतिम भूपाळी करणारा पुरुष एक नाहीं. ती **होनाजी** गवळी व **बाळा** शिंपी या दोघांच्या नांवावर आहे. २ दूषिली. रावणगृहां राहिल्यामुळें अग्नींत दिव्य झाल्यावर, म्ह० देहबुद्धि नष्ट झाल्यावर रामानें सीतेला आलिंगिलें.

### ११ भूपाळी गोपाळाची.

उठिंरे गोपाळा । उघडीं स्वरूपलोचना।।
सरलि अविद्याराती उदयो झाला रविकिरणा ।।
इंद्रियेंगोधनें नेई निर्गुणकानना ।
सुटलीं मानसँवत्सें तुजविण नाकळती कोणा ।।ध्रु० ।।
प्रबोधपहांट झाली सरले तिमिर–तम–रज ।
गुरुकृपेचा अरुण दावी सुरंगसम तेज ।।
आत्मादिनकर पाठीं प्रगट तात्काळिक सहज ।
जिवचंद्राचें मंडळ तेणें झालें निस्तेज ।। १ ।।
दृश्यभास चांदणिया असते ठायिंच लोपलिया।
लिंगदेहकमळींचे मधुकर सुटले आपसया ।।
बुद्धिबोधचक्रवाकें मिनलीं आपणियां ।
देहबुद्धिकुमुदिनी सुकोनि गेलीसे विलया ।। २ ।।
योगविद्येच्या पंथें साधकवृंदें चालियलीं ।
उपनिषद्धागार्थ शब्द केला कोकिळीं ।।
वाग्वादाचे उलूक निघती मौनाचे ढोलीं ।
विकल्पअटवी साहीं चोरीं सांडियलीं ।। ३ ।।

१ इंद्रियचालका ! २ इंद्रियें हीं ओढाळ गुरें. ३ विषयेंद्रियसंयोगानें पुष्ट होणारीं मानसरूपी वासरें ४ हें मुक्तेश्वरी रूपक बहारीचें आहे. गुरुकृपेचा अरुणोदय झाला की आत्मस्वरूपसूर्याचा प्रकाश मागून आलाच; मी ब्रह्म आहें हा अनुभव होतांच जीवपण मावळतें. ५ उपनिषदांनीं गायिलेल्या आत्मस्वरूपाचा बोध होताच वाग्वादरूपी दिवाभीतें सहजच पळून जातात, अर्थात् वाचा-निवृत्ति होते.

विरागरश्मीजवळी धरितां चित्तरविकांत ।
आत्मावन्हि प्रगटे विषयवन हें जाळीत ॥
तृष्णेच्या श्वापदावरी प्रळय अद्भुत ।
विश्व हें लटिकें मूढां मृगजळवत ॥ ४ ॥

जारव्यसनीं जीव हा झाला उदमी सुविचार ।
वासनाकुंटिणिचा सहजें खुंटला व्यापार ॥
लीलाविश्वंभरस्वामी उठिला सत्वर ।
चाले मुक्तेश्वरसंगीं धरूनियां कर ॥ ५ ॥

## १२ वेदांतपर भूपाळीपंचक.

[ ह्या भूपाळींत वेदांताचें रहस्य उत्कृष्ट प्रकारें स्वल्पांत आणलें आहे. जीव आणि शिव हे अनुक्रमें स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण आणि विराट, हिरण्यगर्भ, महत्तत्व व मूळमाया ह्या उपाधिभूत देहांहून निराळे आहेत हें सांगून अष्टदेहाचें निरसन पहिल्या कडव्यांत केलें आहे दुसऱ्यांत देहधर्म, प्राणधर्म व मनोधर्म ह्यांहून जीवाचें असंगत्व दाखवून 'सकळ सच्चिदानंद' हें अन्वयव्यतिरेकानें सिद्ध केलें आहे तिसऱ्यांत विरक्ति, भक्ति व ज्ञान ह्यांचीं लक्षणें सांगून ह्या त्रिवेणीसंगमांत नित्य स्नान करणारा पुरुष वर्णाश्रमधर्मापासूनही कसा मुक्त होतो हें वर्णिलें आहे. चवथ्यांत वृत्तिसाक्षित्व अनुभवून सहजसमाधि कशी साधावी तें सांगितलें आहे, व पांचव्यांत विसर (अज्ञान) विसरून व आठव (ज्ञान) ग्रासून ब्रह्मरूप होऊन गुर्वाज्ञापाळण करीत देहपात होईपर्यंत कसें रहावें तें सांगितलें आहे.]

रामकृष्ण हरि गोविंदा राजिवनयना रे । बापा राजारामारे ।
अनाथबंधो पतितपावना करुणावंतारे ॥ ध्रु० ॥

१

गुरुकरुणोदयकाळीं शिव गुरुवर गीतीं गावा।
स्वहिताकारणें आपुला आपणचि विचार करावा ॥ १ ॥
इंद्रियांसकट स्थूळ नव्हे मी जाणता त्याचा।
याचें कारण विराट नोहे मी देखणा त्याचा ॥ २ ॥
मनबुद्धी दों वृत्तिसिं जाणे अंतःकरणाच्या।
कारण हिरण्यगर्भ तयाचा साक्षी मीं साचा ॥ ३ ॥
स्वरूपीं जे कां विस्मृति तें मायेचें रूप जाणा।
तेंचि येथें कारण मीच जाणे आपणा ॥ ४ ॥
तनुत्रयाचा साक्षी तो मी महाकारण।
तेथिल चौथे महामायेसि मीच वोळखण ॥ ५ ॥
शबलद्वय उपाधि निरसितां जिवशिवपण हरलें।
शुद्ध पूर्णानंदीं रिघतां शिवरामाचें झालें ॥ ६ ॥

२

मीं देह नव्हेसा झालों तेव्हां उपजणें निमणें।
रोड मोठा वृद्ध तरुण हें कांहींच मी नेणें ॥ १ ॥
यापरि विचार करितां मनुजा सुमनें साक्षेपें।
चैतन्य आत्मा मीं हें कळतां विचारही लोपे ॥ २ ॥

---

१ मी केवळ द्रष्टा आहे. २ स्वरूपाची विस्मृति हीच माया.

मनसह अंतःकरणाचा परि देखणाचि वेगळा ।
वर्णाश्रमसुखदुःखें येउनि बाधिति कवणाला ॥ ३ ॥

क्षुधातृषादि प्राणधर्म हे मजला दिसताती ।
मज मीं फिरोनि पाहतां मग हे कवणा बाधीती ॥ ४ ॥

हें जड ऐसें जाणुनि निराळा होउनि पाहतां ।
व्यतिरेकेंची चिदचिद्ग्रंथी सुटे तत्त्वता ॥ ५ ॥

सकळ सच्चिदानंदु हा हो अन्वयाचा बोधु ।
तो जाणावा **शिवरामाचा** परिपूर्णानंदु ॥ ६ ॥

३

विषय इंद्रियें जड ओळखणें तेंची विरक्ती ।
चैतन्याकडे वृत्ति फिरवणें या नांवें भक्ती ॥ १ ॥

मीं चिद्घन वस्तुची प्रतीती शुद्ध तें ज्ञान ।
यापरि त्रिवेणीचें नित्य करावें स्नान ॥ २ ॥

वर्णाश्रमसह युक्ताचारचि इंद्रियां घडे ।
विरक्ति भक्ति ज्ञान हातां आपेआप चढे ॥ ३ ॥

मुळिचा विचार हरपे हर्षामर्ष मग कैचे ।
**शिवराम** भजे पाय पूर्णानंदाचे ॥ ४ ॥

चित् व जड यांची गांठ, कोडें. २ वृत्ति चैतन्याकडे फिरवणे हो भक्ति
मी चिद्घन परमात्मा आहे' असा अनुभव हें ज्ञान.

४

वृत्ती जिकडे धावे तिकडे न जावें तीपाठीं ।
तिचा साक्षी[1] होउनि पाहतां स्वरुपें सदा भेटी ॥ १ ॥
वृत्तिकडे पाहतां वृत्ती आपणांतचि मुरे ।
आपण चैतन्य मात्र केवळ परिपूर्ण उरे ॥ २ ॥
मग देखे[2] ऐके स्पर्शे हुंगे जो जो रस चाखे ।
बोले चाले वेव्हारीतां आपआपणां देखे ॥ ३ ॥
सहजसमाधी सहजचि भोगी पूर्णानंदू रे ।
शिवराम निरावरण होउनी आनंदें वावरे ॥ ४ ॥

५

अरुणोदयकाळीं ह्मणतां पदें पांच हीं ।
अर्था विवरुनि पाहतां होई देहीं विदेही ॥ १ ॥
सद्गुरु–आज्ञावचन पाळणें या नांवें ।
वेव्हारीतां आपण आपणां विसरूं न द्यावें ॥ २ ॥
विसरा विसरुनि आठवा आमुनि आत्मा स्वयें होणें ।
होणें न होणें वृत्तीविण तें अंगीं अनुभवणें ॥ ३ ॥
जगीं आपण भरला आपणामाजीं जग पाहे ।
तो जाणावा शिवरामाचा पूर्णानंदु आहे ॥ ४ ॥

—शिवरामस्वामी.

१ आपण साक्षी–देखणा होऊन वृत्तीकडे पाहूं लागलों कीं वृत्ति चोरासारखी पळून जाते, केवळ स्वरूप राहतें. २ शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध हे पंचविषय.

# ३ हरिपाठाचे अभंग.

१

देवाचिये द्वारीं उभा क्षणभरी । तेणें मुक्ति चारी साधियेल्या ॥ १ ॥
हरि मुखें ह्मणा हरि मुखें ह्मणा । पुण्याची गणना कोण करी ? ॥ २ ॥
असोनि संसारीं जिव्हे वेगु करी । वेदशास्त्र उभारी बाह्या सदा ॥ ३ ॥
**ज्ञानदेव ह्मणे** व्यासाचिये खुणें । द्वारकेचे राणे पांडवाघरीं ॥ ४ ॥

२

संतांचे संगती मनोमार्गे गती । आकळावा श्रीपती येणें पंथें ॥ १ ॥
रामकृष्ण वाचा भाव हा जीवाचा । आत्मा जो शिवाचा राम जप ॥ २
एकतत्त्वनाम साधिती साधन । द्वैताचें बंधन न बाधीजे ॥ ३ ॥
नामामृतगोडी वैष्णवां लाधली । योगियां साधली जीवनकळा ॥ ४ ॥
सत्वर उच्चार प्रल्हादीं बिंबला । उद्धवा लाधला कृष्णदाता ॥ ५ ॥
**ज्ञानदेव ह्मणे** नाम हें सुलभ । सर्वत्र दुर्लभ विरळा जाणे ॥ ६ ॥

३

जपतपकर्मक्रियानेमधर्म । सर्वांघटीं राम भावशुद्ध ॥ १ ॥
न सोडीं रे भावो टाकीं रे संदेहो । रामकृष्णीं टाहो नित्य फोडी ॥ २

१ धर्म २ शिवाचा आत्मा जो राम तो जप ३ अद्वितीय असा जो एक परमात्मा त्याचे नामस्मरण हेच परम साधन साधिती. ४ सतरावी जीवनकळा ५ हरिनाम सोपें असून कोणी घेत नाहीं म्हणून दुर्लभ झाले आहे. ६ जपतपादि सर्व साधनांत सर्वांभूतीं भगवंत पाहणें हें मुख्य आहे.

जातवित्तगोत कुळशीळमात । भजें कां त्वरित भावनायुक्त ॥ ३ ॥
**ज्ञानदेवा** ध्यानीं रामकृष्ण मनीं । तेणें वैकुंठभुवनीं घर केलें ॥ ४ ॥

४

काळवेळ नाम उच्चारितां नाहीं । दोन्ही पक्ष पाहीं उद्धरती ॥ १ ॥
रामकृष्णनाम सर्वा दोषा हरण । जडजीवां तारण हरि एक ॥ २ ॥
हरिनाम सार, जिव्हा या नामाची । उपमा त्या देवाची कोण वानी? ॥ ३
**ज्ञानदेवा** साग झाला नामपाठ । पूर्वजां वैकुंठमार्ग सोपा ॥ ४ ॥

५

नामाचेनि बळें तरिजे संसार । आणिक विचार करूं नको ॥ १ ॥
नाम जपा वेगीं म्हणा हरि हरि । प्रपंच बोहरी आपआप ॥ २ ॥
नित्यता भजन देवद्विज करी । नाम हें उच्चारी रामराम ॥ ३ ॥
निरंतरें जपतु रामनाम वाचें । दहन पापाचें आपआप ॥ ४ ॥

६

स्मरण करितां रामनामध्वनि । ऐकतांचि कर्णीं पळे यम ॥ १ ॥
नामपाठ करी रामकृष्ण हरी । होतील कामारी रिद्धिसिद्धि ॥ २ ॥
साध्य तेंचि साधी न करी उपाधी । जन्मांतरिंच्या व्याधि हरती नामें ॥ ३
**नामा** म्हणे सर्व राम हाचि भाव । नाहीं आणिक देव रामेंवीण ॥ ४ ॥

१ जातिवित्तादि गोष्टी गौण आहेत, श्रद्धेनें हरीला भजणें हें मुख्य आहे. २ आईचा पक्ष व बापाचा पक्ष, किंवा नाम घेणारा व ऐकणारा. ३ ज्यानें आपली जिव्हा नामाकडे योजिली त्याचें भाग्य कोण वाखाणील? ४ निरसतो.

७

हरीचिया दासा हरी दाही दिशा । भावें जैसा तसा हरी एक ॥ १ ॥
हरी मुखी गातां हारपली चिंता । त्या नाही मागुता जन्म घेणें ॥ २ ॥
जन्म घेणं लागे वासनेच्या संगें । तेचि झाली अंगें हरिरूप ॥ ३ ॥
हरिरूप झालें जाणणें हरपलें । नेणणें तें गेलें हरिचे ठायीं ॥ ४ ॥
हरिरूप ध्यानीं हरिरूप मनीं । **एका जनार्दनीं** हरि बोला ॥ ५ ॥

८

हरि बोला देतां हरि बोला घेतां । हांसतां खेळतां हरि बोला ॥ १ ॥
हरि बोला गातां हरि बोला खातां । सर्व कार्य करितां हरि बोला ॥ २ ॥
हरि बोला एकांतीं हरि बोला लोकांतीं । देह त्यागितां अंतीं हरि बोला ॥
हरि बोला भांडतां हरि बोला कांडतां । उठतां बैसतां हरि बोला ॥४॥
हरि बोला जनीं हरि बोला विजनीं । **एका जनार्दनीं** हरि बोला ।५।।

९

पिंडीं देहस्थिती ब्रह्मांडी पसारा । हरीवीण सारा व्यर्थ श्रम ॥ १ ॥
शुक याज्ञवल्क्य दत्त कपिलमुनी । हरिसी जाणोनी हरिच झाले ॥२॥
यारे यारे धरूं हरिनामतारूं । भवाचा सागरू भय नाहीं ॥ ३ ॥
साधुसंत गेले आनंदीं राहिले । हरिनामें झाले कृतकृत्य ॥ ४ ॥
**एका जनार्दनीं** मांडिलें दुकान । देतो मोलेवीण सर्व '**वस्तु**' ॥५॥

१०

**आवडीनें भावें हरिनाम घेसी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥१॥**

नको खेद करूं कोणत्या गोष्टीचा । पती लक्षुमीचा जाणतसे ॥ २ ॥
सकळ जीवांचा करीतो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥
जैसी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहे संचिताचें ॥ ४ ॥
एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश आहे ॥ ५ ॥

११

यमुना कावेरी गंगा भागीरथी । कृष्णा सरस्वती तुंगभद्रा ॥ १ ॥
नर्मदा आठवी वेळोवेळां वाचे । नाहीं भय साचें प्राणियांसी ॥ २ ॥
तयांचे संगती पापी उद्धरती । दर्शनेंचि होती मुक्ति प्राप्त ॥ ३ ॥
तुका ह्मणे नामीं एकनिष्ठभाव । तेथें वासुदेव सर्वकाळ ॥ ४ ॥

१२

प्रातःकाळीं नाम पवित्राचें घ्यावें । तेणें विसरावें जन्ममृत्य ॥ १ ॥
नळ युधिष्ठिर जनक[1] जनार्दन । स्मरणेंचि धन्य होती प्राणी ॥ २ ॥
न करा आळस नाम येतां वाचे । नाहीं भय साचें प्राणीयांसी ॥ ३ ॥
तुका ह्मणे वाचे गाईल गोविंद । होय परमानंद नामें एका ॥ ४ ॥

१ "पुण्यश्लोको नलो राजा पुण्यश्लोको युधिष्ठिर । पुण्यश्लोको विदेहश्च पुण्यश्लोको जनार्दन ॥" असा शुद्ध श्लोक आहे. 'पुण्यश्लोका च वैदेही' असा पाठ फार प्रचलित आहे, पण तुकोबाचा पाठ तरी सीतावाचक नसून जनकवाचक होता असें दिसतें. त्याचप्रमाणें 'अहल्या द्रौपदी सीता तारा मन्दोदरी तथा । पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम्' हा श्लोक शुद्ध असून लोक 'पंचकन्याः स्मरेन्नित्यं' असें ह्मणतात, तें चूक आहे. महापातकनाशनं या विशेषणाचें विशेष्य पंचकं हेंच शोभतें, हें मुलांसही सहज कळणारें आहे. येथें 'ना' ह्मणजे 'नरः' असा अर्थ आहे.

१३

तीर्थांचें जें मूळ व्रतांचें जें फळ। ब्रह्म तें केवळ पंढरीये ॥ १ ॥
तें आम्हीं देखिलें आपुल्या नयनीं। फिटलीं पारणीं डोळियांचीं ॥ २ ॥
जीवांचें जीवन सुखाचें शेजार। उभें कटीं कर ठेवूनियां ॥ ३ ॥
सुरवरां चिंतनीं मुनिवरां ध्यानीं। आकार निर्गुणीं तेंचि असे ॥ ४ ॥
तुका ह्मणे नाहीं श्रुति आतुडेलें। आह्मा सांपडलें गीतीं गातां ॥ ५॥

१४

आवडे हें रूप साजिरें सगुण। पाहतां लोचन सुखावले ॥ १ ॥
आतां दृष्टीपुढें असाचि तूं राहे। जों मी तुज पाहें नारायणा ॥ २ ॥
लांचावलें मन लागलीसे गोडी। तें जीवेंभावें न सोडी ऐसें झालें ॥ ३ ॥
तुका ह्मणे आह्मीं मागावें लडिवाळी। पुरवावी आळी पांडुरंगा ॥ ४ ॥

१५

समाधान चित्ताचें चरणआलिंगन। पायांवरीं मन स्थिरावलें ॥ १ ॥
जैसें केलें तैसें घालूं लोटांगणा। करूं प्रदक्षिणा नमस्कार ॥ २ ॥
प्रार्थितों मीं तुज राहे माझ्या पोटीं। हृदयसंपुटीं देवराया ॥ ३ ॥
क्षेमआलिंगन दिलीं पायीं मिठी। सांडलीसे लुटी अमूप हो ॥ ४ ॥
तुका ह्मणे आतां आनंदीआनंद। गाऊं परमानंद मनासंगें ॥ ५ ॥

१ अनेक जन्मांत ब्रह्म दिसलें नव्हतें तें दिसलें. २ सांपडलें. श्रुति 'नेति नेति' ह्मणतात.



# ४ सकाळसंध्याकाळच्या आरत्या.

## १ काकडआरती.

उठा उठा हो साधक साधा आपुलाले हित ।
गेला गेला हा नरदेह मग कैचा भगवंत ॥ १ ॥
उठा उठा हो वेगेसीं चला जाऊं राउळासी ।
झडतिल पातकांच्या राशी कांकडआरती पाहोनी ॥ २ ॥
जागे करा रुक्मिणीवरा देव आहे निद्सुरा ।
वेगें निंबलोण करा दृष्ट होइल म्हणउनियां ॥ ३ ॥
उठोनियां हो पांहटे पहा विठ्ठल उभा विटे ।
चरण तयाचे गोमटे अमृतदृष्टी अवलोका ॥ ४ ॥
पुढें वाजत्री वाजती ढोल दमामा गर्जती ।
होती कांकडआरती माझ्या पंढरिरायाची ॥ ५ ॥
सिहंनाद शंखभेरी गजर होतो महाद्वारीं ।
केशवराज विटेवरी नामा चरण वंदीतो ॥ ६ ॥

## २ काकडआरती.

भक्तीचीये पोटीं बोधकांकडाज्योती ।
पंचप्राण जीवें भावें ओवाळूं आरती ॥
ओवाळूं आरती माझ्या पंढरीनाथा ।
दोन्ही कर जोडुनी चरणीं ठेविला माथा ॥ ध्रु० ॥

काय महिमा वर्णूं आतां सांगणें तें किती ।
कोटी ब्रह्महत्या मुख पाहतां जाती ॥ १ ॥
राही रखुमाबाई दोन्ही दोंबाहीं ।
मयूरपिच्छचामरें ढाळिती ठाईंच्या ठाईं ॥ २ ॥
विटेसहित पाय ह्मणुनी भावें ओवाळूं ।
कोटि रविशशि दिव्य उगवले हेळूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे दीप घेउनी उन्मनीत शोभा ।
विटेवरी उभा दिसे लावण्यगाभा ॥ ४ ॥

### ३ आरती विठ्ठलाची

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा ॥ वामांगीं रखुमाई दिसे दिव्यशोभा ॥
पुंडलिकाभेटीं परब्रह्म आलें गा ॥ चरणीं वाहे भीमा उद्धरी जगा ॥१॥
जय देव जय देव जय पांडुरंगा ॥ रखुमाईवल्लभा पावें जिवलगा। धृ.
तुळसीमाळा गळां कर ठेवुनि कटीं ॥ कांसे पीतांबर कस्तुरि ललाटीं ॥
देव सुरवर नित्य येती भेटीं ॥ गरुडहनूमंत पुढें उभे राहती । जय०।२।
धन्य वेणूनाद अनुक्षेत्रपाळा ॥ सुवर्णाचीं कमळें पद्माळा गळां ॥
राईरखुमाबाई राणीया सकळा ॥ ओंवाळिती राजा विठोबा सांवळा ॥३॥
ओंवाळूं आरत्या कुरवंड्या येती ॥ चंद्रभागेमध्यें सोडुनियां देती ॥
दिंड्यापताका वैष्णव नाचती। पंढरीचा महिमा वर्णावा कीती। जय।४
आषाढी कार्तीकी भक्तजन येती॥ चंद्रभागेमाजीं स्नान जे करिती ॥
दर्शनहेळामात्रें तयां होय मुक्ति।केशवासी नामदेव भावें ओंवाळीती.५

### ४ आरती ज्ञानेश्वराची.

आरति ज्ञानराजा । महा कैवल्यतेजा ।
सेविती साधुसंत । मनु वेधला माझा ॥ धृ० ॥
लोपलें ज्ञान जगीं । हित नेणती कोणी ।
अवतार पांडुरंग । नाम ठेविलें ज्ञानी ॥ १ ॥
कनकाचें ताट करीं । उभ्या गोपिका नारी ।
नारद तुंबरू हो । साम गायन करी ॥ २ ॥
प्रगट गुह्य बोले । विश्व ब्रह्मचि केलें ।
रामाजनार्दनीं । पायिं टकची ठेलें ॥ ३ ॥

### ५ आरती एकनाथाची.

आरती एकनाथा । महाराजा समर्था ॥
त्रिभुवनिं तूंचि थोर । जगद्गुरु जगन्नाथा ॥ धृ० ॥
एकनाथ नाम सार । वेदशास्त्रांचें गूज ।
संसारदुःख नासे । महामंत्राचें बीज ॥ १ ॥
एकनाथ नाम घेतां । सुख वाटतें चित्ता ।
आनंद गोपाळदासा । धणी न पुरे गातां ॥ २ ॥

### ६ आरती तुकारामाची.

आरती तुकारामा । स्वामी सद्गुरूधामा ।
सच्चिदानंदमूर्ती । पाय दाखवी आम्हां ॥ धृ० ॥
राघवें सागरांत । बहू पाषाण तारिले ।
तैसे हे तुकोबाचे । अभंग रक्षिले ॥ १ ॥

तुकितां तुळणेसी । ब्रह्म तुकासि आलें ।
ह्मणुनी रामेश्वरें । चरणीं मस्तक ठेविलें ॥ २ ॥

### ७ आरती देवाची.

संतसनकादिक भक्त मिळाले आणीक ।
स्वानंदें गर्जती पाहूं आले कौतुक ॥ १ ॥
नवल होताहे आरती देवाधिदेवा ।
स्वर्गींहुनी सुरवर पाहूं येती केशवा ॥ धृ० ॥
नरनारीचे तटस्थ टक पडिले नयना ।
श्रीमुख पाहतां धणी न पुरे मना ॥ २ ॥
एका जनार्दनी मंगळ आरत्या गाती ।
मिळाले वैष्णव जयजयकार गर्जती ॥ ३ ॥

### ८ आरती रामाची.

एक बा ! रामराया ! तुझ्या वंदितों पाया ।
आंवरी आपुली हे विश्वमोहिनी माया ॥ धृ० ॥
मी मूढ हीन दीन सर्वसत्क्रियाहीन ।
तूं क्षमाशील देवा ! शुद्धचरितनिजाधीन ॥ १ ॥
घडो सदा साधुसंग, नसो विषयप्रसंग, ।
सप्रेम भक्ति द्यावी सत्त्व वैराग्य अभंग ॥ २ ॥
वाटतें नित्य भावें तुझे साधुगुण गावे ।
मन हें आवरेना सांग काय म्यां करावें ॥ ३ ॥

करितां संसारकाम मुखीं असो तुझें नाम ।
दयाघना भक्त मोर याचा पुरविसि काम ॥ ४ ॥

### ९ आरती सद्गुरूची.

फळलें भाग्य माझें । धन्य झालों संसारीं ।
सद्गुरू भेटला हो । तेणं धरियेले करीं ।
पश्चिमेसि चालवीलें । आत्मस्तुति निर्धारीं ।
त्रिकूटावरि नांदे । देखियेली पंढरी ॥ १ ॥
तें सुख काय सांगूं । वाचे बोलतां नये ।
आरतीचेनि गुणें । गेलें मीपण माझें ॥ धृ० ॥
राऊळामाजि जातां । राहे देहअवस्था ।
मन हें उन्मन झालें । नसे बद्धतेची वार्ता ।
हेतु हा मावळला । शब्दा आली निःशब्दता ।
तटस्थ होउनि ठेलें । निजरूप पाहातां ॥ २ ॥
आनंदसागरांत । प्रेमें बुडी दीधली ।
लाधलें सौख्य मोठें । नये बोलतां बोली ।
सद्गुरूचेनि संगें । ऐसी आरती केली ।
निवृत्तिआनंदानें । तेथें प्रवृत्ति निमाली ॥ ३ ॥

### १० आरती दत्ताची.

त्रिगुणात्मक त्रैमूर्ती दत्त हा जाणा । त्रिगुणी अवतार त्रैलोक्यराणा ॥
नेति नेति शब्दें नये अनुमाना ॥ सुरवरमुनिजनयोगिसमाधी नये ध्याना १
जय देव जय देव जय श्रीगुरुदत्ता । आरती ओंवाळितां हरली भवचिंता

सबाह्य अभ्यंतरीं तूं एक दत्त । अभाग्यासी कैंची कळे ही मात ॥
पराही परतली तेथें कैंचा हा हेत । जन्ममरणाचाही पुरलासे अंत ।जय.२
दत्त येऊनीयां उभा ठाकला । साष्टांग नमनें प्रणिपात केला ॥
प्रसन्न होऊनि आशिर्वाद दीधला । जन्ममरणाचा बा फेरा वांचविला॥३॥
दत्त दत्त ऐसें लागलें ध्यान । हारपलें मन झालें उन्मन ॥
मीतूंपणासी झाली बोळवण । **एका जनार्दनी** दत्त हा जाण । जय० ४।

## ११ धांवा

धांव रे रामराया । किती अंत पाहासी ॥धांव० ॥ धृ० ॥
प्राणांत मांडिलासे, न ये करुणा कैसी ।
पाहीन क्षणिभरी चरण, झाडीन केशीं ।
नयन शिणले बा, आतां केधवां येशी ॥ धांव० ॥ १ ॥
भीपण अहंकारें अंगीं भरला ताठा ।
विषयकर्दमांत लाज नाहीं लोळतां ।
चिळस उपजेना ऐसें झालें बा आतां ॥ धाव० ॥ २
मारुतिस्कंधभागीं शीघ्र बैसोनि यावें ।
राघवें वैद्यराजें, कृपा—औषध द्यावें ।
दयेचे पद्महस्त माझे शिरीं ठेवावे ॥ धांव० ॥ ३ ॥
या भवीं **रामदास** थोर पावतो व्यथा ।
कौतुक पाहतोसी काय जानकीच्या कांता ।
दयाळा दीनबंधो भक्तवत्सला ताता ॥ धांव० ॥४॥

### १२ पाळणा.

जो जो जो जो रे श्रीरामा । निजसुखगुणविश्रामा ॥ जो जो. ॥धृ
ध्याती मुनियोगी तुजलागीं । कौसल्यावोसंगीं ॥ १ ॥
वेदशास्त्रींची मति जाण । स्वरूपीं झाली लीन ॥ २ ॥
चारीं मुक्तींचा विचार । चरणीं पाहति थोर ॥ ३ ॥
भोळा शंकर निशिदिनीं । तुजला जपतो मनीं ॥ ४ ॥
**दास** गातसे पाळणा । रामलक्ष्मणा ॥ ५ ॥

### १३ प्रदक्षिणा.

धन्य धन्य हे प्रदक्षिणा सद्गुरुरायाची ।
झाली त्वरा सुरवरा विमान उतरायाची ॥ ध्रु० ॥
गुरुभजनाचा महिमा न कळे आगमानिगमांसी ।
अनुभवि ते जाणती जे गुरुपदिचे अभिलाषी ॥ १ ॥
पदोपदीं अपार झाल्या पुण्याच्या राशी ।
सर्वहि तीर्थें घडलीं आम्हां आदिकरुनि काशी ॥ २ ॥
मृदंग टाळ घोळ भक्त भावार्थें गाती ।
नामसंकीर्तनें नित्यानंदें नाचती ॥ ३ ॥
कोटि ब्रह्महत्या हरती करितां दंडवत ।
लोटांगण घालितां मोक्ष लोळे पायांत ॥ ४ ॥
प्रदक्षिणा करुनि देह भावें वाहीला ।
**श्रीरंगात्मज विठ्ठल पुढें उभा राहीला ॥ ५ ॥**

## १४ विडा श्रीकृष्णाचा.

विडा घ्या हो नारायणा । कृष्ण जगन्नजीवना ।
विनविते रखुमाई । दासी होईन मी कान्हा ॥ विडा० ॥ धृ० ॥
शांती ही नागवेली—पान घेऊनीयां करीं ।
मीपण जाळूनीयां चुना लावियेला वरी ॥ विडा० ॥ १ ॥
वासना फोडुनीयां चूर्ण केली सुपारी ।
भावार्थकापुरानें घोळियेली निर्धारीं ॥ विडा० ॥ २ ॥
विवेककातरंग रंगीं रंगला सुरंग ।
वैराग्यजायफळ मेळविलें अभंग ॥ विडा० ॥ ३ ॥
दया ही जायपत्री क्षमालवंगा आणील्या ।
सुबुद्धिवेलदोडे शिवरायीं अर्पियेलें ॥ विडा ॥ ४ ॥

## १५ विडा श्रीरामाचा.

विडा घ्यावा रामराया । महाराज राजया ॥ धृ० ॥
रत्नजडित पानदान । आली जानकी घेवोन ।
विडा देती करूनीयां । दीनबंधो रामराया ॥ १ ॥
सुगंध गंगेरी पानें । मुक्त मोतियांचा चूना ।
सुपारी कातगोळ्या । भक्तिभावें मेळवील्या ॥ २ ॥
जायपत्री जायफळ । विडा जाहला सुफळ ।
सीता रामालागीं देत । केशरकस्तूरीयुक्त ॥ ३ ॥
सीताराम विडा घेतां । ऐक्यभावें एकात्मता ।
रंगली ऐक्यरंगीं । रामदास पायालागीं ॥ ४ ॥

### १६ रात्रींची शेजारती.

हरि चला मंदिरा ऐशा ह्मणती गोपिका ( राधिका )।
भावें ( भक्ती ) ओवाळीती यादवकुळटिळका ॥ १ ॥
एकीकडे राही एकीकडे रखुमाई ।
भावें ओवाळिता हरि जाला दों ठायीं ॥ २ ॥
अष्टादीक सोळा सहस्र ज्याच्या सुंदरा ।
ज्या ज्यांनी प्रार्थिला गेला तयाचिया घरा ॥ ३ ॥
एका जनार्दनीं हरि तूं लाघवी होसी ।
दृनुकयाही भोगुनी ब्रह्मचारी ह्मणविसी ॥ ४ ॥

### १७ रात्रींची शेजारती.

पावला प्रसाद आतां विठो निजावें ।
आपला तो श्रम कळों येतसे भावें ॥ १ ॥
आतां स्वामी सुखें निद्रा करा गोपाळा ।
पुरले मनोरथ जातों आपुलिया स्थळा ॥ २ ॥
तुह्मासी जागवूं आह्मी आपुलिया चाडा ।
शुभाशुभ कर्मे दोष हरावया पीडा ॥ ३ ॥
तुका ह्मणे दिलें उच्छिष्टाचें भोजन ।
नाहीं निवडिलें आह्मां आपुलिया भिन्न ॥ ४ ॥

---

## ५ उपसंहार.

घेऊनी आरती । चक्रपाणी ओवाळिती ॥ १ ॥

आजी पुरले नवस । धन्य काळ हा दिवस ॥ २ ॥
पाहावो सकळा । पुण्यवंता तुह्मी बाळा ॥ ३ ॥
तुका वाहे टाळी । उभा सन्निध जवळी ॥ ४ ॥

१

या रे नाचूं प्रेमानंदें । रामनामाचिया छंदें ॥ १ ॥
कैसी नामाची आवडी । पाप पळे देशधडी ॥ २ ॥
आवडीनें नाम घोका । शरण जनार्दना एका ॥ ३ ॥

२

शेवटची विनवणी । संतजनी परिसावी ॥ १ ॥
विसर तो न पडावा । माझा देवा तुह्मांसी ॥ २ ॥
आतां फार बोलूं काय । अवघें पायी विदीत ॥ ३ ॥
तुका ह्मणे पडलों पायां । करा छाया कृपेची ॥ ४ ॥

३

अवघेंचि त्रैलोक्य आनंदाचें आतां । चरणीं जगन्नाथा चित्त ठेलें ।१
माय जगन्नाथ वाप जगन्नाथ । अनाथाचा नाथ जनार्दन ॥ २ ॥
एका जनार्दनी एकपणें उभा । चैतन्याची गाभा शोभतसे ॥ ३ ॥

४

गोविंदा रामा । जय जय गोपाळा रामा ॥ १ ॥
यादवा रामा । जय जय माधवा रामा ॥ २ ॥
सुलभा रामा । जय जय दुल्लभा रामा ॥ ३ ॥

एक तूं रामा । जय जय अनेक तूं रामा ॥ ४ ॥
एका जनार्दनीं रामा । जय जय निष्कामा रामा ॥ ५ ॥

घालिन लोटांगण वंदीन चरण डोळ्यांनिं पाहिन रूप तुझें ।
प्रेमें आलिंगिन आनंदें पूजिन भावें ओवाळिन म्हणे नामा ॥१॥
त्वमेव माता च पिता त्वमेव त्वमेव बंधुश्च सखा त्वमेव ।
त्वमेव विद्या द्रविणं त्वमेव त्वमेव सर्वं मम देवदेव ॥ २ ॥
कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वानुसृतस्वभावात् ।
करोमि यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयामि ॥ ३ ॥
अच्युत केशवं रामनारायणं कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम् ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं जानकीनायकं रामचंद्रं भजे ॥ ४ ॥
लाभस्तेषां जयस्तेषां कुतस्तेषां पराजयः ।
येषामिंदीवरश्यामो हृदयस्थो जनार्दनः ॥ ५ ॥
आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम् ।
लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम् ॥ ६ ॥
नमस्ते पुरुषाध्यक्ष नमस्ते भक्तवत्सल ।
नमस्तेऽस्तु हृषीकेश नारायण नमोऽस्तु ते ॥ ७ ॥
नमोस्त्वनंताय सहस्रमूर्तये सहस्रपादाक्षिशिरोरुबाहवे ।
सहस्रनाम्ने पुरुषाय शाश्वते सहस्रकोटीयुगधारिणे नमः ॥ ८ ॥
गोविंद गोविंद हरे मुरारे गोविंद गोविंद रथांगपाणे ।
गोविंद गोविंद मुकुंद कृष्ण गोविंद गोविंद नमो नमस्ते ॥ ९ ॥

आकाशात्पतितं तोयं यथा गच्छति सागरम् ।
सर्वदेवनमस्कारः केशवंप्रति गच्छति ॥ १० ॥
हरे राम हरे राम रामराम हरे हरे ।
हरे कृष्ण हरे कृष्ण कृष्ण कृष्ण हरे हरे ॥ ११ ॥
नारायण नारायण जय गोविंद हरे ।
नारायण नारायण जय गोपाळ हरे ॥ १२ ॥
जय पुंडलीकवरदे हरिविठ्ठल । ज्ञानदेव तुकाराम ॥

## ६ भजनें.

( १ ) रघुपतिराघव राजाराम । पतीतपावन सीताराम ॥
( २ ) रामलक्ष्मणजानकी । जय बोलो हनुमानकी ॥
( ३ ) राम राम राम जप सीताभिराम ॥
( ४ ) मारुतिराया बलभीमा । शरण आलों मज द्या प्रेमा ॥
( ५ ) दत्तात्रय अवधूता । जनार्दनस्वामि एकनाथा । गुरुदत्ता ॥
( ६ ) रामदास गुरु माझे आई । मजला ठाव द्यावा पायीं ॥
( ७ ) जयजय रामकृष्ण हरी । सांवळ्या रामकृष्ण हरी ॥
( ८ ) शिव हर रे शिव हर रे । सांब सदाशिव शिव हर रे ।
शिवहर शंकर गौरीशं । वंदे गंगाधरमीशम् ॥
( ९ ) ज्ञानोबा माउली तुकाराम ॥
( १० ) जीवाचे जिवलगे । मनाचे मोहने । येई पांडुरंगे ॥

( ११ ) राम हरे गोविंद । शिव शिव । कृष्ण हरे गोविंद ॥

( १२ ) नारायण नारायण जय गोविंद हरे ।

नारायण नारायण जय गोपाल हरे ॥

( १३ ) गुरु महाराज गुरु । जय जय परब्रह्म सद्गुरु ॥

( १४ ) नारायण विधि अत्रीनाथ । दत्त जनार्दन एकनाथ ॥

( १५ ) कृष्ण गोविंद गोविंद । गोपाल राधे ॥

( १६ ) सच्चित्प्रेमानंद । भजरे गोविंद गोविंद ॥



# २ ईश्वरस्तुति

बुद्धीचें वैभव अन्य नाहीं दुजें ।
एक्या केशीराजें सकळ सिद्धी ॥ १ ॥
—श्रीज्ञानेश्वर.

## १ करुणाष्टकें.

( श्रीरामदासस्वामीकृत )

१

अनुदिनिं अनुतापें तापलों रामराया ।
परमदिनदयाळा नीरसी मोहमाया ॥
अचंपळ[1] मन माझें नावरे आवरीतां ।
तुजविण शिण होतो धांव रे धांव आतां ॥ १ ॥
भजनरहित रामा सर्वही जन्म गेला ।
स्वजनजनधनाचा व्यर्थ म्यां स्वार्थ केला ॥
रघुपति मति माझी आपुलीसी करावी ।
सकळ त्यजुनि भावें कांस तूझी धरावी ॥ २ ॥
तनुमनधन माझें राघवा रूप तुझें ।
तुजविण मज वाटे सर्व संसार ओझें ॥

---

१ चंचल, अस्थिर. 'अनुत्तम' त्या शब्दाप्रमाणें अचपळ या शब्दाची योजना येथें समर्थांनीं केली आहे. ' नास्ति चपलो यस्मात् स अचपलः ' अतिचपळ.

प्रचलित न करावी सर्वथा बुद्धि माझी ।
अचल भजनलीला लागली आस तूझी ॥ ३ ॥
चपळपण मनाचें मोडितां मोडवेना ।
सकळ स्वजनमाया तोडितां तोडवेना ॥
घडि घडि विघडे हा निश्चयो अंतरीचा ।
म्हणवुनि करुणा हे बोलतों दीनवाचा ॥ ४ ॥
जळत हृदय माझें जन्म कोट्यानुकोटी ।
मजवरि करुणेचा राघवा पूर लोटी ॥
तळमळ निववी रे राम कारुण्यसिंधू ।
षड्रिपु कुळ माझें तोडि याचा समंधु ॥ ५ ॥
स्वजनजनधनाचा कोण संतोष आहे ? ।
रघुपतिविण आतां चित्त कोठें न राहे ॥
जिवलग जिव घेती प्रेत सांडोनि जाती ।
विषय सकळ नेती मागुता जन्म देती ॥ ६ ॥
सकळ जन भवाचे आथिले वैभवाचे ।
जिवलग मज कैचे चालते हेच साचें ॥
विलगविषमकाळीं सांडिती सर्व माळीं ।
रघुविर सुखदाता सोडवी अंतकाळीं ॥ ७ ॥

१ संपन्न टिकणारे. २ विलग—प्लेग वगैरेंचे उपद्रव, विषम—दारिद्र्य, परचक्र वगैरेंचे उपद्रव, विलगकाळीं व विषमकाळीं मरणावर [illegible] हरी सहायक.

उपरति मन रामीं जाहली पूर्णकामीं ।
सकळजनविरामीं रामविश्रामधामीं ।
घडिघडि मन आतां रामरूपीं भरावें ।
रघुकुळटिळका रे आपुलेसें करावें ॥ ८ ॥

२

नसे भक्ति ना ज्ञान ना ध्यान कांहीं । नसे प्रेम हें रामविश्राम नाहीं ।
असा दीन अज्ञान मी दास तूझा । समर्था जनीं घेतला भार माझा ॥१॥
रघूनायका जन्मजन्मांतरींचा । अहंभाव छेदोनि टाकी दिनाचा ।
जनीं बोलती दास या राघवाचा। परी अंतरीं लेश नाहीं तयाचा २
रघूनायका दीन हातीं धरावें । अहंभाव छेदोनियां उद्धरावें ।
अगूणी तयालागिं गूणी करावें । समर्थें भवसागरीं ऊतरावें ॥ ३ ॥
किती भार घालूं रघूनायकाला । मजकारणें शीण होईल त्याला ।
दिनानाथ हा संकटीं धांव घाली । तयाचेनि हे सर्व काया निवाली ४
मला कोवसा राम कैवल्यदाता । तयाचेनि हे फीटली सर्व चिंता ।
समर्था तया काय उत्तीर्ण व्हावें । सदा सर्वदा नाम वाचें वदावें ॥५॥
दिनाचें उणें दीसतां लाज कोणा । जनीं दास तूझा दिसे दैन्यवाणा ।
शिरीं स्वामि तूं राम पूर्णप्रतापी । तुझा दास पाहे सदा शीघ्रकोपी ६

३

युक्ति नाहीं बुद्धि नाहीं विद्या नाहीं विवंचितां ।
नेणता भक्त मी तूझा बुद्धि दे रघुनायका ॥ १ ॥

---

१ सर्वांचें विश्रामस्थान. २ आधार. ३ मोक्ष-ज्ञान देणारा. ४ सारासारविचार.

मन हें आवरेना कीं वासना वावडे सदा ।
कल्पना धांवते सैरा बुद्धि दे रघुनायका ॥ २ ॥
अन्न नाहीं वस्त्र नाहीं सौख्य नाहीं जनांमधें ।
आश्रयो पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ३ ॥
बोलतां चालतां येना कार्यभाग कळेचिना ।
बहु मी पीडिलों लोकीं बुद्धि दे रघुनायका ॥ ४ ॥
तुझा मी टोणपा झालों कष्टलों बहुतांपरी ।
सौख्य तों पाहतां नाहीं बुद्धि दे रघुनायका ॥ ५ ॥
नेटकें लिहितां येना वाचितां चुकतों सदा ।
अर्थ तों सांगतां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ६ ॥
प्रसंग वेळ तर्केना सुचेना दीर्घसूचना ।
मैत्रिकी राखितां येना बुद्धि दे रघुनायका ॥ ७ ॥
कळेना स्फूर्ति होईना आपदा लागली बहु ।
प्रत्यहीं पोट सोडीना बुद्धि दे रघुनायका ॥ ८ ॥
संसार नेटका नाहीं उद्वेग वाटतो जिवीं ।
परमार्थ कळेना कीं बुद्धि दे रघुनायका ॥ ९ ॥
देईना पुर्विना कोणी उगेचि जन हांसती ।
विसरु पडतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १० ॥
पिशुनें वाटती सर्व कोणीही मजला नसे ।
समर्था तूं दयासिंधु बुद्धि दे रघुनायका ॥ ११ ॥

उदास वाटतें जीवीं आतां जावें कुणीकडे ।
तूं भक्तवत्सला रामा बुद्धि दे रघुनायका ॥ १२ ॥
कायावाचामनोभावें तुझा मी ह्मणवीतसें ।
हे लाज तूजला माझी बुद्धि दे रघुनायका ॥ १३ ॥
सोडवील्या देवकोटी भूभार फेडिला बळें ।
भक्तांसि आश्रयो मोठा बुद्धि दे रघुनायका ॥ १४॥
उदंड भक्त तुह्मांला आह्मांला कोण पुसतें ! ।
ब्रीद तें राखणें आधीं बुद्धि दे रघुनायका ॥ १५ ॥
उदंड ऐकिली कीर्ति पतीतपावना प्रभो ।
मी एक रंक दुर्बुद्धि बुद्धि दे रघुनायका ॥ १६ ॥
आशा हे लागली मोठी दयाळू बा दया करीं ।
आणीक नलगे कांहीं बुद्धि दे रघुनायका ॥ १७ ॥
रामदास ह्मणे माझा संसार तुज लागला ।
संशयो वाटतो पोटीं बुद्धि दे रघुनायका ॥ १८ ॥

४

उदासीन हे वृत्ति जीवीं धरावी । अती आदरें सर्व सेवा करावी ।
सदा प्रीति लागो तुझे गूण गातां । रघूनायका मागणें हेंचि आतां ॥ १ ॥
तुझें रूप हें लोचनीं म्यां पहावें । तुझे गूण गातां मनेंसी रमावें ।
उठो आवडी भक्तिपंथेंचि आतां ॥ रघू० ॥ २ ॥

मनीं वासना भक्ति तूझी करावी । कृपाळूपणें राघवें पूरवावी ।
वसावें मदीयांतरीं नाम घेतां ॥ रघू० ॥ ३ ॥
सदा सर्वदा योग तूझा घडावा । तुझे कारणीं देह माझा पडावा ।
उपेक्षू नको गुणवंता अनंता ॥ रघू० ॥ ४ ॥
नको द्रव्यदारा नको येरझारा । नको मानसीं ज्ञानगर्वें फुगारा ।
सगूणीं मला लावि रे भक्तिपंथा ॥ रघू० ॥ ५ ॥
भवें तापलों प्रीतिछाया करावी । कृपासागरें सर्व चिंता हरावी ।
मला संकटीं सोडवावें समर्था ॥ रघू० ॥ ६ ॥
मनीं कामना कल्पना ते नसावी । कुबुद्धी कुडी वासना नीरसावी ।
नको संशयो तोडि संसारवेथा ॥ रघू० ॥ ७ ॥
समर्थापुढें काय मागूं कळेना । दुराशा मनीं बैसली हे ढळेना ।
तुटे संशयो नीरसीं सर्व चिंता ॥ रघू० ॥ ८ ॥
ब्रिदाकारणें दीन हातीं धरावें । म्हणे दास भक्तांसि रे उद्धरावें ।
सुटे ब्रीद आम्हासि सोडोनि जातां ॥ रघू० ॥ ९ ॥

५

विश्वात्मा! करुणाकरा! बहुत मी योनी पहा हिंडलों ।
कोठेंही सुख पाहिलें न नयनीं नानापरी दंडलों ॥
कांहीं पुण्य उभारितां अवचटें आलों नृदेहाप्रती ।
आतां जन्म पुन्हां नको रघुपते दे मुक्ति कीं शीघ्र ती ॥ १ ॥

---

१ वाईट, पापमूलक. २ व्यथा, चिंता. ३ दुष्ट आशा; स्त्री, पुत्र, धन, यांच्या-विषयींच्या आशा, लोलुपता.

रामा! मी तव दासदास म्हणवीं, मातें कशाचें भय? ।
रामा! जाइन जे स्थळीं सुखघना! होईल तेथें जय! ॥
रामा! या भुवनत्रयीं तुजविणें नाहीं दुजा तारक ।
रामा! तूं सकळार्थ पूर्ण करिसी तूं तात मी बाळक ॥ २ ॥

न जाणें मी पूजा, न मज समजे ध्यान करणें, ।
न जाणें रूपातें, न कळत कशी प्रीति धरणें, ॥
न जाणें पायांतें, न मज तरि सत्संग घडला, ।
तुझे नामीं रामा! दिननिशिं मम प्राण जडला ॥ ३ ॥

ज्या कीर्तनें नारद धन्य केला। ज्या कीर्तनें वाल्मिकि मुक्ति नेला।
ज्या कीर्तनें 'तारिसि' घोष ऐसा। त्या कीर्तना सांडिन साग कैसा! ॥

तूं सेव्य मी सेवक योग्य नातें । तूं गेय मी गायक, तारि मातें ।
तूं जाप्य मी जापक पूर्णकामा । सायुज्यदाता तरि तूंचि रामा ॥५॥

स्तंभावांचुनि हें उभें नभ असे, पृथ्वी जळीं कीं तरे ।
देहो हा बहुछिद्रभग्न असतां त्यामाजिं वायू ठरे, ।
ऐसे खेळ अचाट दावुनि पहा तूं भिन्न सर्वांहुनी, ।
तूतें स्वानुभवें विलोकिति जगीं नैराश्यवेत्ते मुनी ॥ ६ ॥

कोठें माहिषअंतरांत शिरुनी वेदांतही बोलसी, ।
स्कंधीं कावड वाहसी, निजमुखें कोणापुढें जेविसी ॥

---

१ स्तव्य, गाण्यास योग्य. २ ज्ञानेश्वरांनीं रेड्याकडून वेद बोलविले.

कोठें कागद तारिसी, दळिसी तूं, कोठें पशू ओढिसी!।
कोणाचें रिण वारिसी, परि मला कां हातिचा सोडिसी? ॥७॥
—पांडुरंग

[ ६ ]

( १ )

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु०॥
मन हें चंचळ न राहे निश्चळ । निरूपणीं पळ स्थिरावेना ॥ १ ॥
सांडूनियां ध्यान विषयचिंतन । करितसे मन आवरेना ॥ २ ॥
**रामदास** ह्मणे कथानिरूपणें । मनाचीं लक्षणें जैसीं तैसीं! ॥ ३ ॥

( २ )

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ ध्रु० ॥
वैराग्याचा लेश नाहीं माझे अंगीं । बोलतसे जगीं शब्दज्ञान ॥ १ ॥
देह हें कारणीं लावावें नावडे । आळस आवडे सर्व काळ ॥ २ ॥
**रामदास** ह्मणे लाज तुझी तूज । कोण पुसे मज अनाथासी ॥ ३ ॥

( ३ )

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ धृ० ॥
भक्तीची आवडी नाहीं निरंतर । कोरडें अंतर भावेंविण ॥ १ ॥
माझें मीतूंपण गेलें नाहीं देवा । काये करूं ठेवा संचिताचा ॥ २ ॥
**रामदास** ह्मणे पतीताचें उणें । पतीतपावनें सांभाळावें ॥ ३ ॥

( ४ )

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ धृ० ॥
मुखें बोले ज्ञान पोटीं अभिमान । पाहे परन्यून सर्वकाळ ॥ १ ॥
दृढ देहबुद्धि तेणें नाहीं शुद्धि । जाहलों मी क्रोधी अनिवार ॥ २ ॥
रामदास ह्मणे ऐसा मी अज्ञान । सर्व ब्रह्मज्ञान बोलोनीयां ! ॥ ३ ॥

( ५ )

पतीतपावना जानकीजीवना । वेगीं माझ्या मना पालटावें ॥ धृ० ॥
मिथ्या शब्दज्ञानें तुज अंतरलों । संदेहीं पडलों मीपणाचे ॥ १ ॥
सदा खळबळ निर्गुणाची घडे । सगुण नावडे ज्ञानगर्वें ॥ २ ॥
रामदास ह्मणे ऐसा मी पतीत । मीपणें अनंत पाहों जातां ॥ ३ ॥

( ६ )

मी खरा पतीत तूं खरा पावन । आतां अनुमान करूं नको ॥ धृ० ॥
आतां मज कांहीं माझी चिंता नसे । तुझें नाम कैसें वांचईल ॥ १ ॥
समर्थे घेतला नांवालागीं भार । मज उपकार कासयाचा ॥ २ ॥
रामदास ह्मणे तुझें तुज उणें । सोईरीं पिसुणें हांसतील ॥ ३ ॥

---

## २ अभंग.

श्रीज्ञानेश्वर ( १–२ ) १

रूप पाहतां लोचनीं । सुख झालें वो साजणी ॥ १ ॥
तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा ॥ २ ॥

बहुता सुकृताची जोडी । म्हणोनि विठ्ठलीं आवडी ॥ ३ ॥

सर्व सुखाचें आगर । बाप रखुमादेवीवर ॥ ४ ॥

२

अवघाचि संसार सुखाचा करीन । आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥

जाईनगे माये तया पंढरपुरा । भेटेन माहेरा आपुलिया ॥ २ ॥

सर्व सुकृताचें फळ मी लाहीन । क्षेम मी देईन पांडुरंगीं ॥ ३ ॥

बापरखुमादेवीवरू विठ्ठलेंसी भेटी । आपुलें संवसाठीं करूनि ठेला ॥ ४

श्रीनामदेव ( ३-१५ )

३

बोलूं ऐसे बोल । जेणें बोलें विठ्ठल डोले ॥ १ ॥

प्रेम सर्वांगाचे ठायीं । वाचे विठ्ठलरखुमाई ॥ २ ॥

नाचूं कीर्तनाचे रंगीं । ज्ञानदीप लावूं जगीं ॥ ३ ॥

परेहूनि परतें घर । तेथें राहूं निरंतर ॥ ४ ॥

सर्व सत्ता आली हातां । नामयाचा खेचर दाता ॥ ५ ॥

४

आपुली पदवी सेवकांसी द्यावी । तो एक गोसावी पांडुरंग ॥ १ ॥

भावाचा आंकुका भुलला भक्तिसुखा । सांपडला फुका नामासाठीं ॥ २ ॥

प्रेमाचा जिव्हाळा नामाची आवडी । क्षण एक न सोडी संग त्याचा ॥ ३ ॥

नामा म्हणे आम्हां दीनांचें माहेर । तो एक उदार पांडुरंग ॥ ४ ॥

---

१ परावाणीच्याही पलीकडे. २ दासांला स्वसाम्य देणारा तोच प्रभु. ३ भुकेलेला.

५

तुझिया सत्तेनें वेदांसी बोलणें । सूर्यासी चालणें तुझिया बळें ॥ १ ॥
ऐसा तूं समर्थ ब्रह्मांडाचा धनी । वर्म हें जाणुनी शरण आलों ॥ २ ॥
मेघांनीं वर्षावें, पर्वतीं बैसावें, । वायूनें विचरावें सत्ते तुझे ॥ ३ ॥
नामा ह्मणे कांहीं न हाले साचार । प्रभू तूं निर्धार पांडुरंगा ॥ ४ ॥

६

पंढरीस जावें जीवन्मुक्त व्हावें । विठ्ठला भेटावें जिवलगा ॥ १ ॥
काया वाचा मन चरणीं ठेवावें । प्रेमसुख घ्यावें सर्वकाळ ॥ २ ॥
सुखाचें साजिरें श्रीमुख पहावें । जीवें उतरावें निंबलोण ॥ ३ ॥
बाहेर भीतरीं कैवल्य आघवें । वाचे न बोलवे ब्रह्मानंदु ॥ ४ ॥
चिरंजीव नामा कंठीं धरी प्राण । करी तुझें ध्यान रात्रंदिवस ॥ ५ ॥

७

देह जावो अथवा राहो । पांडुरंगीं दृढ भावो ॥ १ ॥
चरण न सोडी सर्वथा । आण तुझी पंढरिनाथा ॥ २ ॥
वदनीं तुझें मंगळ नाम । हृदयीं अखंडित प्रेम ॥ ३ ॥
नामा ह्मणे केशवराजा । केला पण चालवी माझा ॥ ४ ॥

८

अमृताहुनी गोड नाम तुझें देवा । मन माझें केशवा कां बा नेघे ॥ १ ॥
सांग पंढरिराया काय करूं यासी ? । कां रूप ध्यानासी न ये तुझें ? ॥ २ ॥

---

१ खचित तुझ्या सत्तेवांचून झाडाचें पानही हालत नाहीं. ह्मणून तुला 'प्रभु' ह्मणतों.

कीर्तनीं बैसतां निद्रें जागवीलें । मन माझें गुंतलें विषयसुखा ॥३॥
हरिदास गर्जती हरिनामाच्या कीर्ती । नये माझ्या चित्तीं नामा ह्मणे ४

९

पंढरीचा वास चंद्रभागे स्नान । आणीक दर्शन विठोबाचें ॥ १ ॥
हेंचि मज घडो जन्मजन्मांतरीं । मागणें श्रीहरी नाहीं दुजें ॥ २ ॥
मुखीं सदा नाम संतांचें दर्शन । जनीं जनार्दन ऐसा भाव ॥ ३ ॥
नामा ह्मणे नित्य तुझे महाद्वारीं । कीर्तन गजरीं सप्रेमाचें ॥ ४ ॥

१०

तूं माझी मांउली मी वो तुझा तान्हा । पाजी प्रेमपान्हा पांडुरंगे॥१॥
तूं माझी गाउली मी तुझें वासरूं । नको पान्हा चोरूं पांडुरंगे ॥२॥
तूं माझी हरिणी मी तुझें पाडस । तोडीं भवपाश पांडुरंगे ॥ ३ ॥
तूं माझी पक्षिणी मी तुझें अंडज । चारा घाली मज पांडुरंगे ॥ ४ ॥
नामा ह्मणे होसी भक्तीचा वल्लभ । मागें पुढें उभा सांभाळिसी ॥ ५ ॥

११

माझे मनोरथ पूर्ण कीजे देवा । केशवा माधवा नारायणा ॥ १ ॥
नाहीं नाहीं मज आणिक सोयरा । न करीं अव्हेरा पांडुरंगा ॥ २ ॥
अनाथाचा नाथ होसी तूं दयाळ । किती वेळोवेळां प्रार्थूं आतां ॥३॥
नामा ह्मणे जीव होतो कासावीस । केली तुझी आस आतां तरी ४

१ देवभक्तांचे नातें मायलेंकरांचें आहे, हें या गोड अभंगांत किती प्रेमळपणानें सांगितलें आहे! देवाला 'बाप' म्हणण्यापेक्षा 'आई' म्हणणें उत्तम.

१२

तुझें प्रेम माझें हृदया आवडी । चरण मी न सोडीं पांडुरंगा ॥ १ ॥
इंद्रियांचें व्यापार अवघेचि तोडी । प्रेमरसगोडी देईं मातें ॥ २ ॥
चंद्र चकोराचा पुरवी सोहळा । काय त्याच्या कळा न्यून होती ? ॥३॥
नामा म्हणे मज अनाथा संभाळी । हृदयकमळीं स्थिर राहे ॥४॥

१३

काय गुणदोष माझे विचारिसी । आहे मी तों राशी अपराधांची॥१॥
अंगुष्ठापासोनी मस्तकापर्यंत । अखंड दुश्चित आचरलों ॥ २ ॥
स्वप्नीं देवा तुझी नाहीं घडली भक्ती । पुससी विरक्ती कोठोनियां॥३॥
तूंचि माझा गुरु तूंचि तारी स्वामी । सकळ–अंतर्यामीं गाऊं तुज॥४॥
नामा म्हणे माझें चुकवी जन्ममरण । नको करूं शीण पांडुरंगा ॥५॥

१४

ममता तुटेना मज केशिराजा । अंगीं भाव दुजा लागे पाठीं ॥ १ ॥
शरीरीं तितिक्षा[1] नाहीं क्षमाशांती । यालागीं श्रीपती वायां गेलों ॥२॥
नामा म्हणे देवा तारिसी पतिता । म्हणोनियां सत्ता केली आम्हीं॥३॥

१५

हरि रे वाटेवेळ झाला । कोण्या भक्तानें गोंविला ॥ १ ॥
झडकरि येईं गा विठ्ठला । कंठ आळवितां शोषला ॥ २ ॥
प्राण केव्हां येईल माझा । आलिंगीन चहूं भुजा ॥ ४ ॥
नामा गहिंवरें दाटला । पूर धरणीये लोटला ॥ ५ ॥

---

१ शीतोष्णादि द्वंद्व सोसण्याची शक्ति, सोशिकता.

जनाबाई ( १६-२० )

१६

येग येग विठाबाई । माझे पंढरीचे आई ॥ १ ॥
भीमा आणि चंद्रभागा । तुझ्या चरणीच्या गंगा ॥ २ ॥
इतुक्यासहित त्वां बा यावें । माझ्या रंगणीं नाचावें ॥ ३ ॥
माझा रंग तुझे गुणीं । ह्मणे नामयाची जनी ॥ ४ ॥

१७

ज्याचा सखा हरि । त्यावरि विश्व कृपा करी ॥ १ ॥
उणें पडों नेदी त्याचें । वारें सोसी आघातांचें ॥ २ ॥
तयावीण क्षणभरी । कदा आपण नव्हे दुरी ॥ ३ ॥
आंग आपुलें वोढोनी । त्याला राखे जो निर्वाणीं ॥ ४ ॥
ऐसा अंकित भक्तांसी । ह्मणे नामयाची दासी ॥ ५ ॥

१८

कां गा न येसी विठ्ठला । ऐसा कोण दोष मला ! ॥ १ ॥
माय बाप तूंचि धणी । मला सांभाळी निर्वाणीं ॥ २ ॥
त्वां बा उद्धरिले थोर । तेथें कोण मी पामर ॥ ३ ॥
दीननाथा दीनबंधु । जनी ह्मणे कृपासिंधु ॥ ४ ॥

१९

चिंतन चित्ताला । लावी मनाच्या मनाला ॥ १ ॥
उन्मनीच्या[2] सुखाआंत । पांडुरंग भेटी देत ॥ २ ॥
कवटाळुनी भेटीपाठीं । जनी ह्मणे सांगू गोष्टी ॥ ३ ॥

१ सुखदुःखादिकांचें. २ जेथें मन लीन होतें अशी तुर्येच्या पलीकडची पांचवी अवस्था.

२०

आम्ही पातकाची राशी । आलों तुझ्या पायांपाशीं ॥ १ ॥
मना येइल तें तूं करी । आतां तारी अथवा मारी ॥ २ ॥
जनी ह्मणे सृष्टीवरी । एक असशी तूं बा हरी ॥ ३ ॥

श्रीएकनाथ ( २१–३२ ) २१

जन्मोजन्मीं आम्ही बहु पुण्य केलें । मग या विठ्ठलें कृपा केली ॥ १ ॥
जन्मोनीं संसारीं झालों त्याचा दास । माझा तो विश्वास पाडुरंगीं ॥२॥
भ्रमर सुवासीं मधावरी मासी । तैसें या देवासी मन माझें ॥ ३ ॥
आणिका देवांसीं नेघे माझें चित्त । गोड गातां गीत विठोबाचें ॥ ४ ॥
एका जनार्दनीं मज तेथें न्यावें । हाडसोनी द्यावें संतांपाशीं ॥ ५॥

२२

अणुरेणूपासूनी ब्रह्मांडीं भरला । तो म्या देखीला विटेवरी ॥ १ ॥
स्थावर जंगम भरूनी उरला । तो म्यां देखिला पंढरीये ॥ २ ॥
वेदशास्त्रपुराणें गाती जयासाठीं । तो पुंडलिकापाठीं उभा दिसे ॥ ३ ॥
वेडावल्या श्रुती न कळे ह्मणती । तो उभा श्रीपती वाळुवटीं ॥ ४ ॥
संतांचा समागम गाती आनंदानें । तो हरिकीर्तनें नाचतसे ॥ ५ ॥
एका जनार्दनीं सुखाचा सागरू । विठ्ठल कल्पतरू भेटला[1] आह्मां ॥६॥

२३

तुमचें नामसंकीर्तन । हेंचि माझें संध्यास्नान ॥ १ ॥
तुमचे पायाचा साक्षेप । हाचि माझा कालक्षेप ॥ २ ॥

---

१ प्रसन्न झाला.

तुमचे पायाचें वंदन । हेंचि माझें अनुष्ठान ॥ ३ ॥
तुमचे पायापाशीं निद्रा । हेचि माझी प्रेममुद्रा ॥ ४ ॥
एका जनार्दनाकार । ब्रह्मरूप हा संसार ॥ ५ ॥

२४

अनंताचे गुण अनंत अपार । न कळेचि पार श्रुतिशास्त्रां ॥ १ ॥
तो हा महाराज विटेवरी उभा । लावण्याचा गाभा शोभतसे ॥ २ ॥
कटीवरी कर ठेवी जगजेठी । पाहे कृपादृष्टीं भक्ताकडे ॥ ३ ॥
पुंडलिकाचे तेजें जोडलासे ठेवा । एका जनार्दनीं सेवा देई देवा ॥ ४ ॥

२५

कायां ही पंढरी आत्मा हा विठ्ठल । नांदतो केवळ पांडुरंग ॥ १ ॥
भावभक्ति भीमाउदक तें वाहे । बरवा शोभताहे पांडुरंग ॥ २ ॥
दयाक्षमाशांति हेंचि वाळुवंट । मिळालासे थाट वैष्णवांचा ॥ ३ ॥
ज्ञान ध्यान पूजा विवेक आनंद । हाचि वेणुनाद शोभतसे ॥ ४ ॥
दश इंद्रियांचा एक मेळा केला । ऐसा गोपाळकाला होत असे ॥ ५ ॥
देहीं देखिली पंढरी जनीं वनीं । एका जनार्दनीं वारी करी ॥ ६ ॥

२६

देवा माझें मन लागो तुझे चरणीं । संसारव्यसनीं पडों नेदी ॥ १ ॥
नामस्मरण घडो संतसमागम । वाउगाचि भ्रम नको देवा ॥ २ ॥

---

१ प्रेमसमाधि. २ गर्भ, सार. ३ जगन्नाथ. ४ ह्या उत्कृष्ट अभंगाचें निरंतर मनन करावें. असेच चोखामेळा, तुकाराम यांचे अभंग आहेत.

पायीं तीर्थयात्रा मुखीं रामनाम । हाचि माझा नेम सिद्धीं नेई ॥३॥
आणिक मागणें नाहीं नाहीं देवा । एका जनार्दनीं सेवा दृढ देई ।४।

२७

भाव तोचि देव भाव तोचि देव । ये अर्थी संदेह धरूं नका ॥१॥
भावें भक्ति फळे भावें देव मिळे । निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥२॥
भावचि कारण भावचि कारण । यापरतें साधन नाही नाहीं ॥ ३ ॥
एका जनार्दनीं भावाच्या आवडी । मनोरथ कोडी पुरती तेणें ।४।

२८

मन माझें वेधलें मन माझें वधलें । पाहतां भलें सच्चिदानंद ॥ १ ॥
आनंदीआनद मनासी पै जाला । देखिला सांवळा पाडुरंग ॥ २ ॥
एका जनार्दनीं उघडाची देखीला । आनंद तो झाला मनी माझ्या ।३।

२९

येथुनि पाहे तेथवरी । तंव तंव अवघा दिसे हरी ॥ १ ॥
आतां जाउनि कोठें पाहूं । जेथें पाहूं तेथें देवू ॥ २ ॥
गिरिकपाटीं कंदरी । जिकडे पाहे तिकडे हरी ॥ ३ ॥
एका बैसला निरंजनीं । जनार्दन जनीं वनीं ॥ ४ ॥

३०

भक्तिप्रेमाविण ज्ञान नको देवा । अभिमान नित्य नवा तयामाजी ॥१
प्रेमसुख देई प्रेमसुख देई । प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ २ ॥

---

८१ श ज्ञा च्या ज्ञानाबरोबर अहंकार वाढत असतो.

रांडवेनें जेविं शृंगारू केला । प्रेमेंविण झाला ज्ञानी तैसा ॥ ३ ॥
एका जनार्दनीं प्रेम अति गोड । अनुभवीं सुरवाड जाणतील । ४ ।

३१

तुजविण आह्मां कोण आहे देवा । धाव यादवराया मायबापा ॥ १ ॥
पडिलोंसे डोहीं प्रपचओंवर्नी । कोण करी शांति तुजविण ? ॥ २ ॥
जन्ममरणाचा पडिलासे फेरा । सांडवीं दातारा मायबापा ॥ ३ ॥
एका जनार्दनीं धावे लवलाही । येवोनीया हृदयीं ठाव देई ॥५॥

३२

सकळ देवाचा जनिता । त्रिगुणसत्ता चाळविता ॥ १ ॥
शरण जाता त्याच्या पाया । सर्व हारपली माया ॥ २ ॥
भेदाभेद निवारले । सर्व स्वरूप कोंदले ॥ ३ ॥
एका जनार्दनीं शिवें । जीवपणा मुकलों जीवें ॥ ४ ॥

श्रीतुकाराम (३३–४४)

३३

सुंदर तें ध्यान उभें विटेवरी । कर कटावरी ठेवुनीयां ॥ १ ॥
गळां तुळसीहार कासे पीतांबर । आवडे निरंतर हेंचि रूप ॥ २ ॥
मकरकुंडलें तळपती श्रवणीं । कंठीं कौस्तुभमणी विराजीत ॥ ३ ॥
तुका म्हणे माझें हेंचि सर्व सुख । पाहीन श्रीमुख आवडीनें ॥ ४ ॥

---

१ सुख, प्रेमानंद. हा अभंग उत्कृष्ट आहे. २ भोवऱ्यांत. ३ लवकर, तात्काळ. ४ 'गुणेभ्यश्च परं वेत्ति मद्भावं सोऽधिगच्छति' (गीता अ० १४). ५ शोभतात.

३४

शरण शरण नारायणा । मज अंगीकारा दीना ॥ १ ॥
भावें आलों लोटांगणीं । लोळे तुमचे चरणीं ॥ २ ॥
सांडियेली काया । वरी ओंवाळुनी पायां ॥ ३ ॥
तुका म्हणे शीर । ठेविलें पायांवर ॥ ४ ॥

३५

कन्या सासऱ्यासी जाये । मागें परतोनी पाहे ॥ १ ॥
तैसें झालें माझ्या जीवा । कधीं भेटसी केशवा ! ॥ २ ॥
चुकलिया माये । बाळ हुरुहुरू पाहे ॥ ३ ॥
जीवनावेगळी मासोळी । तुका तैसा तळमळी ॥ ४ ॥

३६

शास्त्रांचें जें सार वेदांची जो मूर्ती । तो माझा सांगाती प्राणसखा ॥ १ ॥
म्हणऊनी नाहीं आणिकांचा पांग । सर्व झालें सांग नामें एका ॥ २ ॥
सगुण निर्गुण जयाचीं हीं अंगें । तोंचि आम्हांसंगें क्रीडा करी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्हीं विधीचे जेंनिते । स्वयंभू, आईते, केले नव्हों ॥ ४ ॥

३७

नलगे हें मज तुझें ब्रह्मज्ञान । गोजिरें सगुण रूप पुरे ॥ १ ॥
लागला उशीर पतीतपावना । विसरोनि वचना गेलासी या ॥ २ ॥

---

१ गुण गात चरणीं लोळतों. २ किती प्रेमळ भावना ही ! ३ गरज, पर्वा, आधीनता. ४ आम्ही ब्रह्मदेवाचे बाप अनादि आहोत. नेमिलेले नव्होत.
“—— [illegible] । मी भक्त तूं देव ऐसें करीं ”

जाळोनि संसार बैसलों अंगणीं । तुझे नाहीं मनीं मानसींही ॥ ३ ॥
तुका ह्मणे नको रागेजों विठ्ठला । उठीं देईं मला भेटी आतां॥ ४॥

३८

देखोनीयां तुझ्या रूपाचा आकार । उभा कटीं कर ठेवूनीयां ॥ १ ॥
तेणें माझ्या चित्ता होतें समाधान । वाटतें चरण न सोडावे ॥ २ ॥
मुखें गातों गीत वाजवीतों टाळी । नाचतों राउळीं प्रेमसुखें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मज तुझ्या नामापुढें । तुच्छ हें बापुडें सकळही ॥ ४ ॥

३९

न मिळो खावया न वाढो संतान । परि हा नारायण कृपा करो ।१।
ऐसी माझी वाचा मज उपदेशी । आणीक लोकांसीं हेंची सांगे॥२॥
विटंबो शरीर होत कां विपत्ती । परी राहो चित्तीं नारायण ॥ ३ ॥
तुका ह्मणे नाशिवंत हें सकळ । आठवे गोपाळ तेंची हित ॥ ४ ॥

४०

तुजविण वाणीं आणिकाची योगी । तरी माझी हरी जिव्हा झडो ॥१॥
तुजविण चित्ता आवडे आणीक । तरी हा मस्तक भंगो माझा ॥ २ ॥
नेत्रीं आणिकांसी पाहीन आवडी । जातु तेचि घडी चांडाळ हे ॥ ३ ॥
कथामृतपान न करिती श्रवण । काय प्रयोजन मग त्यांचें ॥ ४ ॥
हात पाय तुझें पथीं न चालतां । जावोत अनंता गळोनियां ॥ ५॥
तुका ह्मणे काय वांचून कारण । तुज एक क्षण विसंबतां[1] ॥ ६ ॥

---

[1] वर्णन करी.

४१

घेई घेई माझे वाचे । गोड नाम विठोबाचें ॥ १ ॥
डोळे तुह्मी घ्या रे सुख । पहा विठोबाचें मुख ॥ २ ॥
तुह्मी आईका रे कान । माझ्या विठोबाचे गुण ॥ ४ ॥
मना तेथें धांव घेई । राही विठोबाचे पायीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे माझ्या जीवा । नको सोडूं या केशवा ॥ ५ ॥

४२

पतिव्रते जैसा भ्रतार प्रमाण । आम्हा नारायण तैशापरी ॥ १ ॥
सर्व भावें लोभ्या आवडे हें धन । आह्मां नारायण तैशापरी ॥ २ ॥
तुका ह्मणे एकविध झालें मन । विठ्ठलावांचून नेणें दुजें ॥ ३ ॥

४३

पापाची वासना नको दावूं डोळां । त्याहूनी आंधळा[1] बराच मी ॥ १ ॥
निंदेचें श्रवण नको माझे कानीं । बधिर करोनी ठेवी देवा ॥ २ ॥
अपवित्र वाणी नयो माझ्या मुखा । त्याजहुनी मुका बराच मी ॥ ३ ॥
नको मज कधीं परस्त्रीसंगती । जनांतुनी माती[2] उठतां भली ॥ ४ ॥
तुका ह्मणे मज अवघ्यांचा कंटाळा । तूं एक गोपाळा आवडसी ॥ ५ ॥

४४

विठ्ठल आमुचें जीवन । आगमनिगमाचें[3] स्थान ।
विठ्ठल सिद्धीचें साधन । विठ्ठल ध्यानविसांवा[4] ॥ १ ॥

१ परस्त्री सौंदर्याला भुललेले डोळेहा चर्पटनाथांनीं काढून टाकले !! २ मरण पुरवलें. ३ वेदशास्त्रांचें मूळ. ४ ध्यानाचा विसावा.

विठ्ठल कुळींचें दैवत । विठ्ठल वित्त गोत चित्त ।
विठ्ठल पुण्यपुरुषार्थ । आवडे मातें विठ्ठलाची ॥ २ ॥
विठ्ठल विस्तारला जनीं । सप्तहि पाताळें भरूनी ।
विठ्ठल व्यापक त्रिभुवनीं । विठ्ठल मुनिमानसीं ॥ ३ ॥
विठ्ठल जीवाचा जिव्हाळा । विठ्ठल कृपेचा कोंवळा ।
विठ्ठल प्रेमाचा पुतळा । लावियेलें चाळा विश्व विठ्ठलें ॥ ४ ॥
विठ्ठल बाप माय चुलता । विठ्ठल भगिनी आणि भ्राता ।
विठ्ठलेंविण चाड नाहीं गोता । तुका ह्मणे आता नाहीं दुसरें ५

४५

मी अवगुणी अन्यायी । किती ह्मणोनि सांगों कायी ।
आता मज पायीं । ठाव देई विठ्ठले ॥ १ ॥
पुरे पुरे हा संसार । कर्म बळिवंत दुस्तर ।
राहों नेदी स्थीर । एके ठायीं निश्चळ ॥ २ ॥
अनेक बुद्धीचे तरंग । क्षणक्षणा पालटती रंग ।
धरूं जातां संग । तंव तो होतो बाधक ॥ ३ ॥
तुका म्हणे आता । अवघी तोडं माझी चिंता ।
येउनि पंढरिनाथा । वास करीं हृदयीं ॥ ४ ॥

४६

आगी लागो तया सुखा । जेणें हरी नये मुखा ॥ १ ॥
मज होत कां विपत्ती । पांडुरंग राहो चित्तीं ॥ २

१ गोष्ट, कथा. २ भुवनें. ३ आवड.

जळो तें समूळ । धन संपत्ति उत्तम कूळ ॥ ३ ॥
तुका म्हणे देवा । जेणें घडे तुझी सेवा ॥ ४ ॥

४७

का रे नाठविसी कृपाळु देवासी । पोसितो जगासी एकलाची ॥१॥
बाळा[1] दुग्ध कोणी केलेंसे उत्पत्ती । वाढवी श्रीपती सवें दोन्ही ॥२॥
फुटती तरुवर उष्णकाळमासीं । जीवन तयांसी कोण घाली ॥ ३ ॥
तेणें तुझी काय नाहीं केली चिंता । राहे त्या अनंता आठवूनी ॥४॥
तुका म्हणे ज्याचें नांव विश्वंभर[2] । करा निरंतर ध्यान त्याचें ॥५॥

४८

ज्याचें जया ध्यान । तेंची होय त्याचें मन ॥ १ ॥
म्हणउनि अवघे सारा । पांडुरंग दृढ धरा ॥ २ ॥
समरखूण ज्याचे पाय । उभा व्यापक विटे ठाय ॥ ३ ॥
तुका म्हणे नभा । परता आणूचाही गाभा[3] ॥ ४ ॥

४९

गोविंद गोविंद । मना लागलीयां छंद ॥ १ ॥
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ २ ॥

१ बाळाच्या वाढीबरोबर दुधाचीही वाढ होत असते. २ विश्वाचा पोषणकर्ता.
३ ‘तुका म्हणे व्यापक नभा । होई अणूचाही गाभा’ ॥

आनंदलें मन । प्रेमें पाझरती लोचन ॥ ३ ॥

तुका म्हणे आळी । जेवीं नुरेची वेगळी ॥ ४ ॥

५०

पडतां जडभारी । दासें आठवावा हरी ॥ १ ॥

मग तो होऊं नेदी शीण । आड घाली सुदर्शन ॥ २ ॥

नामाच्या चिंतनें । बारा वाटा पळती विघ्नें ॥ ३ ॥

तुका म्हणे प्राण । करा देवासी अर्पण ॥ ४ ॥

५१

रूपीं जडले लोचन । पायीं स्थिरावलें मन ॥ १ ॥

देहभाव हारपला । तुज पाहतां विठ्ठला ॥ २ ॥

कळों नये सुखदुःख । तहान हारपली भूक ॥ ३ ॥

तुका म्हणे नव्हे परती । तुझ्या दर्शनें मागुती ॥ ४ ॥

५२

बोलणेंचि नाहीं । आतां देवाविणें कांहीं ॥ १ ॥

एकसरें केला नेम । देवा दिले क्रोध काम ॥ २ ॥

पाहेन ते पाय । जोंवरी हे दृष्टी धाय ॥ ३ ॥

तुका म्हणे मनें । हेचि संकल्प वाहणें ॥ ४ ॥

२ भिंगुरटी कीटकातें धरी । कोंडी भिंती माजिलें घरीं ॥
ते मरणभयें ध्यान करी । निरंतरी भ्रमराचें ॥ १ ॥
तेणें तीव्रध्यानें ती किटी । होऊनि ठाके भिंगुरटी ॥
भ्रमर सजे उठाउठी । प्रत्यक्ष दृष्टी देखिजे ॥२॥ (एकनाथी भागवत. अ. ९)

राम नित्यनिरंतरीं । राम सबाह्य अंतरीं ।
राम विवेकाचे घरीं । भक्तीवरी सांपडे ॥ २ ॥
राम भावें ठायीं पडे । राम भक्तीशीं आतुडे ।
राम ऐक्यरूपीं जोडे । मौन पडे श्रुतींशीं ॥ ३ ॥
राम योग्याचें मंडण । राम भक्ताचें भूषण ।
राम आनंदाचा घन । करी रक्षण दासाचें ॥ ४ ॥

६१

राम गावा राम ध्यावा । राम जीवीचा विसावा ॥ १ ॥
कल्याणाचें जें कल्याण । रघुरायाचें गुणगान ॥ २ ॥
मंगळाचें जें मंगळ । राम कौसल्येचा बाळ ॥ ३ ॥
राम कैवल्याचा दानी । रामदासा अभिमानी ॥ ४ ॥

६२

दासाची संपत्ती राम सीतापती । जीवाचा सांगाती राम एक ॥ १ ॥
राम एक माता राम एक पिता । राम एक भ्राता सहोदर ॥ २ ॥
सहोदर विद्या वैभव कांचन । सर्व हा स्वजन राम एक ॥ ३ ॥
राम एक स्वामी राम हा कैवारी । लाभ या संसारीं राम एक ॥ ४ ॥
राम एक ज्ञान राम एक ध्यान । राम समाधान रामदासीं ॥ ५ ॥

६३

राम कृपाकर विठ्ठल साकार । दोघे निराकार एकरूपें ॥ १ ॥
आमुचिये घरीं वस्ती निरंतरीं । हृदयीं एकाकारीं राहियेले ॥ २ ॥
रामदास म्हणे धरा भक्तिभाव । कृपाळु राघव पांडुरंग ॥ ३ ॥

६४

कां बो राममाये दुरी धरियेलें। कठिण कैसें जालें चित्त तुझें ॥ १ ॥
देउनी आलिंगन प्रीतिपडिभरें। कैं मुख पीतांबरें पुससील ? ॥ २ ॥
घेउनी कडिये धरुनी हनुवटी। कैं गुज गोष्टी सांगसील ? ॥ ३ ॥
रामदास ह्मणे केव्हां संबोखिसी। प्रेमपान्हा देशी जननीये ॥ ४ ॥

६५

अपराधी अपराधी। आम्हां नाहीं दृढबुद्धी ॥ १ ॥
माझे अन्याय अगणित। कोण करील गणित ॥ २ ॥
मज सर्वस्वें पाळावें। प्रतीतीनें सांभाळावें ॥ ३ ॥
माझी वाईट करणी। रामदास लोटांगणी ॥ ४ ॥

६६

शिरीं आहे रामराज। औषधाचें कोण काज ॥ १ ॥
जो जो प्रयत्न रामावीण। तो तो दुःखासी कारण ॥ २ ॥
शंकराचें हळाहळ। जेणें केलें सुशीतळ ॥ ३ ॥
आह्मां तोचि तो रक्षिता। रामदासीं नाहीं चिंता ॥ ४ ॥

६७

सोडी संसाराची आस। धरी भक्तीचा हव्यास ॥ १ ॥
दुःखमूळ हा संसार। तयामध्यें भक्ति सार ॥ २ ॥
ग्रंथ पाहतां लक्षकोटी। जेथें तेथें भक्ती मोठी ॥ ३ ॥
जन्मा आलियाचें फळ। दास ह्मणे तें केवळ ॥ ४ ॥

६८

बाळक जाणेना मातेसी । तिचें मन तयापासीं ॥ १ ॥
तैसा देव हा दयाळ । करी भक्ताचा सांभाळ ॥ २ ॥
धेनु वत्साचेनी लागें । धांवे त्याच्या मागेंमागें ॥ ३ ॥
पक्षी घेतसे गगन । पिल्यांपाशीं त्याचें मन ॥ ४ ॥
मत्स्य आठवितां पाळी । कूर्म दृष्टीनें सांभाळी[1] ॥ ५ ॥
रामी रामदास ह्मणे । मायाजाळाचीं लक्षणें ॥ ६ ॥

६९

हरिभक्ति करी धन्य तो संसारी । जयाचा कैवारी देवराणा ॥ १ ॥
देवराणा सदा सर्वदा मस्तकीं । तयासी या लोकीं चाड नाहीं ॥२॥
चाडे नाहीं जनीं राघवाचा दास । सार्थक वयस रामदासीं ॥३॥

७०

देव जवळीं अंतरीं । भेटी नाहीं जन्मवरी ॥ १ ॥
मूर्ति त्रैलोक्यीं संचली । दृष्टि विश्वाची चुकली ॥ २ ॥
मार्गें आले संतजन । झालें देवाचें दर्शन ॥ ३ ॥
रामदासीं योग झाला । देहीं देव प्रगटला ॥ ४ ॥

निळोबाराय (७१-७२)

७१

बैसला तो ध्यानींमनीं । पाहतां लोचनीं विठ्ठल ॥ १ ॥
रूप गोजिरे सुंदर । वेधिलें अंतर मनबुद्धी ॥ २ ॥

१ मत्स्य स्मरणाने व कासव दृष्टीने आपल्या पोराना पोसते.
२ आंबड, पर्या.

नाठवेचि कांही आतां । याविण चित्ता दुसरें ॥ ३ ॥
निळा ह्मणे लाविलें पिसें । मीं मज तुमसे आठवितां ॥ ४ ॥

७२

पाचारिता यावें बोळविना जावें । हें तों न संभवे तुह्मांपांशीं ॥१॥
जेथील तेथेंची प्रगटाल रूपडें । आपुल्या मुखवाडें भक्तांचीया ॥२॥
जाणें येणें नाहीं तुह्मा कदाकाळीं । असा भूमंडळीं व्यापुनियां ॥३॥
निळा ह्मणे ऐसें जाणोनीया मनीं । करितों अनुदिनीं स्तवन तुमचें ४॥

[illegible]दयार्णव ( [illegible] ) ७३

गोविंदा तू जळ मी तेथ कल्लोळ । असों सर्वकाळ ऐक्यसुखें॥ १ ॥
तू बिंब मी तेज तू हेतु मी काज । व्यापक तूं पूज्य पूजक मी २॥
अणुचा वियोग नसे तुह्मा आह्मां । आजी मघश्यामा सांडूं नको ३॥
तू रस मी गोडी तू वृक्ष मी वाढी । तू शक्ति मी प्रौढी सामर्थ्याची ४॥
दयार्णवस्वामी मी तुझा सेवक । वियोगाचें दुःख साहों नेणे ५॥

[illegible] ( [illegible] ) ७४

भावभक्ती अंगीं उठे । प्रेमभरें कंठ दाटे ॥ १ ॥
दाटे प्रेमाश्रु लोचनीं । रोम राहे उभारूनी ॥ २ ॥
उठोनिया आलिंगाया । आतां जातां नये पाया ॥ ३ ॥
पायां पडुनि स्तवूं जरी । तरी शब्द नुमटे हरी ॥ ४ ॥
हरिलें त्वां देहभान । आतां कोणा करूं नमन ॥ ५ ॥
जन दत्तरूप होतां । वासुदेवा ये धन्यता ॥ ६ ॥

# ३ पदें.

( यांत एकनाथ, नामदेव, रामदास, आनंदतनय, केशवस्वामी, रंगनाथ, वामन पंडित, शिवतनय (प्रल्हाद बडवे), बोधलेबोवा, मध्वमुनीश्वर, कोकिळ, अमृतराय, सोहिरोबा, गिरिधर, देवनाथ, कविराय (रामजोशी), विठोबा अण्णा दप्तरदार कृष्णंभट बांदकर व माणिकप्रभु यांचीं वेंचक पदें आहेत )

१

तें मन निष्ठुर कां केलें । जें पूर्ण दयेनें भरलें ॥ ध्रु० ॥
गजेंद्राचे हाकेसरिसें । धांउनियां आलें ॥ १ ॥
प्रल्हादाच्या भावार्थासी । स्तंभीं गुरगुरलें ॥ २ ॥
पांचाळीच्या करुणावचनें । कळवळुनी जालें ॥ ३ ॥
एकाजनार्दनपूर्णकृपेनें । निशिदिनिं पदिं रमलें ॥ ४ ॥

२

सगुणचरित्रें परम पवित्रें हरिचीं वर्णावीं ।
सज्जनवृंदें मनोभावानें आधीं वंदावीं ॥ ध्रु० ॥
संतसंगें अंतररंगें नाम बोलावें ।
कीर्तनरंगीं देवासंनिध सुखेंचि डोलावें ॥ १ ॥
भक्तिज्ञानाविरहित गोष्टी इतरा न कराव्या ।
प्रेमभरें बा ! वैराग्याच्या युक्ती विवराव्या ॥ २ ॥
जेणेंकरुनी मूर्ति ठसावे अंतरिं श्रीहरिची ।
ऐसी कीर्तनमर्यादा ही देवाचे घरची ॥ ३ ॥

१ चित्त भगवद्भक्तीनें रंगवून.

अद्वयभजनें अखंडस्मरणें वाजवि करताळी ।
एकाजनार्दनीं मुक्ति होय तात्काळीं ॥ ४ ॥

३

मन रामीं रंगलें अवघें मनचि राम झालें ।
सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें हो ॥ ध्रु० ॥
आत्मयारामाचें ध्यान लागलें मज कैसें ।
क्रिया कर्म धर्म अवघें येणेंचि प्रकाशे ।
सत्य मिथ्याप्रकृतिपर अवघा रामचि भासे हो॥ १ ॥
चित्तचि हरपलें अवघें चैतन्य जाहलें ।
देखतां देखतां अवघें विश्व मावळलें ।
पाहतां पाहणें अवघें द्वैतभान निमालें हो ॥ २ ॥
भक्ति ज्ञान वैराग्य लाधे सहज आत्मस्थिती ।
निर्धारितां रामरूपीं जडलीसे प्रीती ।
एकाजनार्दनीं अवघा रामचि आदिअंतीं हो ॥३॥

४

पतीतपावन नाम ऐकुनी आलों मी दारा ।
पतीतपावन न होसि म्हणुनी जातों माघारा ॥ध्रु०॥
मोडी देवा ! [1]द्वैत आतां न होसि अभिमानी ।
पतीतपावन नाम तुजला ठेवियलें कोणीं ॥ १ ॥

१ देव व भक्त यांचें ऐक्य भावून.

घेसी तेव्हां देसी ऐसा असली ऊदार ।
काय देवा ! रोधूं तुमचें कृपणाचें दार ॥ २ ॥
उच्छिष्टाचें शीत देवा न टाकिसी बाहेरी ।
कोणीं दिधली भगवंत तुजला भूषणाची थोरी ! ॥ ३ ॥
**नामा** ह्मणे बा तुमचें नलगे मज कांहीं ।
प्रेम असों द्या हृदयीं तुमचे आठवीन पाई ॥ ४ ॥

५

आह्मी काय कुणाचें खातो रे । तो राम आह्माला देतो रे ॥ ध्रु० ॥
बांधिले घुमट किल्याचे तट ; तयाला फुटती पिपळवट ।
तेथें कोण लावितो मोट । बुडाला पाणि घालीतो ? ॥ १ ॥
खडक फोडितां सजिव रोडकी । पाहिली सर्वांनि बेडकी ।
सिंधु नसतां तियेचे मुखीं । पाणी कोण घालीतो ? ॥ २ ॥
पहा रे पहा मातेचीये स्तनीं । चिंतितां रक्तमांसमलखाणी ।
तिथें विमल दुग्ध घालोनी । कोण पोसीतो ? ॥ ३ ॥
नसतां पाण्याचे बुडबुडे । सदासर्वदा गगन कोरडें ।
**दास** ह्मणे जीवन चहूंकडे । पाडुनि सेंड पीक उगवीतो ? ॥ ४ ॥

१ सर्व जीवभाव हरण करितोस तेव्हा स्वस्वरूप देतोस २ ऐश्वर्यवन ३ हे सुंदर पद 'मी समर्थांच्या मठातले त्यांचे शिष्य पोसतो' ह्मणून शिवरायाला अहंकार झाला होता तो घालविण्याकरिता समर्थांनी त्यास रानात नेऊन 'खडक फोडून सजीव बेडकी' दाखविली, तेव्हा रचिलें आहे चारही दृष्टान्त सृष्टीतले समर्पक असल्यामुळे या पदाला गोडी आली आहे.

६

कां रे नाठविसी कमलनयन वासुदेव ॥ ध्रु० ॥
जपति जया सतसनक । सकळजनां जननिजनक ॥ कां रे० ॥ १ ॥
कलुषहरण विमलचरित । करुनि निजानंदभरित ॥ कां रे० ॥ २ ॥
विचर आनंदतनय । हृदयिं धरुनि नंदतनय ॥ कां रे० ॥ ३ ॥

७

धांव विभो करुणाकर माधव देव दयानिधि देवकिनंदन ॥ ध्रु० ॥
हे करुणाकर दीनजनोद्धर हा भव दुस्तर यातुनि उद्धर ॥ १ ॥
काममदादिक गांजिति हे अति धाव रमापति सेवकहितकर ॥ २ ॥
जननमरणभय हरण करि त्वरें चरणि शरण तव केशव किंकर ॥३॥

८

तोंवरि निजसुख नाहीं रे । ऐसें कळलें पाहीं रे ॥ ध्रु० ॥
सतसमागम जोडेना । संशयमंडप मोडेना ॥ १ ॥
गुणमयरजनी नासेना । बोधतमारि प्रकाशेना ॥ २ ॥
केशवस्वामी भेटेना । भवाब्धीतरी दाटेना ॥ ३ ॥

९

घडि घडि घडि चरण तुझे आठवती रामा ॥ ध्रु० ॥
दीन दीन आस तुझी पूर्णकाम आम्हा ॥ १ ॥

१ सत्व रज, तम या त्रिगुणांच्या कर्दमापासून सारें जग झालें आहे, त्या-
तांतहि गुणांना खालीं टाकून श्रीकृष्णानें अर्जुनास बोधिल्याप्रमाणें ' निस्त्रैगुण्य
झाल्याविना ' अहमात्मा ' या बोधसूर्याचा उदय होणार नाहीं व असें झाल्या-
विना आत्मसुख नाहीं.

मात तात भ्रात नाथ तूंचि एक पाही ॥ २ ॥
केशव ह्मणे करि दया शरण तुझे पायीं ॥ ३ ॥

१०

कळों आली माव[1] रे । भक्तीपाशीं देव रे ! ।
न पाहेची याती, कूळ, । कर्म, मूळ भाव रे ! ॥ ध्रु० ॥
कोण पुण्यश्लोक[2] रे । गोकुळींचे लोक रे ।
गोपवेषें जयां घरीं । ब्रह्मांडनायक रे ! ॥ १ ॥
दुर्लभ ब्रह्मादिकां । त्यासी गोपी बायका ।
हर्षें नाचवीती । वाजवूनी करताळिका ॥ २ ॥
प्राणाच्या निरोधनें[3] । नव्हे साध्य साधनें ।
लीलारूपविग्रही तो । चारिताहे गोधनें ॥ ३ ॥
भाविकांचा बंध[4] रे । तोडी जगद्वंद्य रे ! ।
यशोदेनें ऊखळीं तो बांधिला गोविंद रे ! ॥ ४ ॥
ज्याचा जैसा हेत रे । तया तैसा होत रे ! ।
निजानंदीं पूर्णरंगी रंगला अनंत रे ! ॥ ५ ॥

११

अर्जुना तूं जाण[5] रे ! । होसी बा सुजाण रे ! ।
विश्व नाहीं, मीचि आहे, सखया ! तुझी आण रे ! ॥ ध्रु० ॥

१ माया. २ पुण्यवंत गवळी. ३ योगाभ्यासानें जो परमात्मा साध्य नाहीं तो लीलादेहधारी गुरें राखतो ! ४ भवबंध तोडितो. ५ हें सुंदर पद 'मया ततमिदं सर्वं' (गीता अ. ९) या श्लोकाधारें केलें आहे असें दिसतें.

मातीमाजी घट रे ! । तंतूमाजी पट रे ! ।
माती तंत विचारितां कैचा घट पट रे ! ॥ १ ॥
मिथ्या सोन्यामाजी रे ! । अलंकार साजिरे ! ।
तेंसें विश्व मजमाजी सांगतों हें आजि रे ! ॥ २ ॥
रज्जू सर्पाकार रे ! । सर्प ना तो दोर रे ।
सर्प तोही दोरामाजी वाझेचें तें पोर रे ॥ ३ ॥
हेमीं अलंकार रे ! । पाण्याची ते गार रे ।
हेम पाणी पाहूं जाता कैचा तो आकार रे ॥ ४ ॥
तेंसें जग हें पाहीं रे ! । जेव रामीं दृष्टी नाहीं रे ! ।
रामीं राम झाल्या मग जग कैचें काय रे ॥ ५ ॥
अंडें कोटी सर्व रे ! । मजमाजी सर्व रे ! ।
न मी त्यांत न तीं मजमध्यें हें अपूर्व रे ! ॥ ६ ॥
राजविद्या गूज रे ! । सांगतसें तूज रे ! ।
कलीमाजी वामनाभी हेंचि देणें मज रे ! ॥ ७ ॥

१२

देवा न लगे तुमचें कांहीं हो । चंचळ हें मन निश्चळ होउनि ।
विनटो तुमचे पायीं हो ॥ ध्रु० ॥
न लगे गृहधन सुतदारा मज इंद्रपदादि कदाही हो ।
तव पदपंकजभजनेंविण मज सर्वहि ते आपदाही[1] हो ॥ १ ॥
देशीं वर जरि तरि तूं आतां याचि स्वरूपें राहीं हो ।

१ आपत्ति. हरीवाचून सर्व असून आपत्तिरूप आहे.

यावच्चंद्रदिवाकर येथुनि कोठेंही नव जाई हो ॥ २ ॥
दर्शनमात्रें जड मुढ पापी निजपदवी त्यां देई हो ।
**शिवतनय** तव दीन–तयाचे हृदयमंदिरा येई हो ॥ ३ ॥

१३

सांगड बांधा रे भक्तीची । रघुनाथनामाची ॥ ध्रु० ॥
संसार सागर सागर । भरला जातो पूर ॥ १ ॥
लाटा उसळती विषयांच्या । बहुत प्रपंचाच्या ॥ २ ॥
नरहरि **बोधला** बोधिला । हरिनामीं रंगला ॥ ३ ॥

१४

तूं माझा यजमान । रामा ॥ ध्रु० ॥
जननीजठरीं राक्षियलें मज । पोसुनि पंचहि प्राण ॥ रामा० ॥ १ ॥
बाहेर निघतां मातेचे स्तनीं । पय केलें निर्माण ॥ रामा० ॥ २ ॥
ऐसें असतां या पोटाची । कां करुं चिंता जाण ॥ रामा० ॥ ३ ॥
**मध्वमुनीश्वर**स्वामि रमापति । धरि माझा अभिमान ॥ रामा० ॥४

१५

केला राम धणी राम धणी । अगणित ज्याची करणी ॥ ध्रु० ॥
रामीं रतली वाणी । आतां मुखासि नाहीं हाणी ॥ केला० ॥ १ ॥
रामावांचुनि कांहीं । आणिक साधन उरलें नाहीं ॥ केला० ॥२॥
**कोकिळप्रभु**सी ध्यातां । सहजचि निजपद आलें हातां ॥ केला० ३

१ ' येरवीं माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता । काय समर्थाची कांता । कोरान्न मागें ! ॥ ( ज्ञानेश्वर. )

१६

स्मरतां नित्य हरी । मग ती माया काय करी ॥ ध्रु० ॥
श्रवणें मननें अद्वयवचनें । पळतो काळ दुरी ॥ १ ॥
करुणाकर वरदायक हरि जो । ठेवित हात शिरीं ॥ २ ॥
तोचि निरंतर उद्धवचरणीं । अमृतपान करी ॥ ३ ॥

१७

हरि मज कसा करिल भवपार ॥ ध्रु० ॥
तन मन धन विषयावरि वळतें । भजनीं आळस फार ॥ १ ॥
स्वात्महुद्धि विचारुनि पाही । कोणि न केला उपकार ॥ २ ॥
अमृत ह्मणे तुह्मि भजा निरतर । श्रीधरगुरुचे पाय ॥ ३ ॥

१८

चिंता प्राण्याचीं हरिला ॥ ध्रु० ॥
पक्ष्यां-पदरीं संचय कैचा । चारा पुरवि तयांला ॥ १ ॥
किडिमुंगी कांहीं मागत नाहीं । साखर देई तयांला ॥ २ ॥
अमृत ह्मणे हरिघरिं काय उणें । जो जें मागे देई तयाला ३

१९

हरिस्मरणविस्मरण तरि तुझें काय जिणें रे असून ॥ ध्रु० ॥
स्वार्थचि साधिसि सार्थक नेणसी । कोणासि पहा तरि पुसून ।
पुढें नाहीं गति माळिण जाली मति । साधुचि संगति नमून ॥१
रतीविलासीं लंपट होसी । मानस गेलें डसून ।
लवकर सर कीं पडशिल नरकीं । फुटक मरसिल कुसून ॥२॥

आळशी कामा उगा रिकामा । थट्टाचि करिसी बसून ।
कुकर्माच्या कांहिं वर्माच्या । गोष्टि सांगसि किसून ॥ ३ ॥
शरीर फिरवी तुजला मिरवी । देव असे रे रुसून ।
जवळि असून तुझें हृदयीं बसून । भगवंत नये रे दिसून ॥४॥
ह्मणे सोहिरा गुरूनाथ हा । माझ्या हृदयीं घुसून ।
जनांसि उद्धरावयाकारणें । वचन सांगतों ठसून ॥ ५ ॥

२०

हरिभजनावीण काळ घालवूं नको रे ॥ धृ० ॥
दोरिच्या सापा भिउनि भवा । भेटि नाहीं जिवा शिवा ।
अंतरिचा ज्ञानदिवा । मालवूं नको रे ॥ १ ॥
विवेकाची ठरेल ओल । ऐसे बोलावे की बोल ।
आपुले मतें उगिच चिखल । कालवूं नको रे ॥ २ ॥
संतसंगतीनें उमज । आणुनि मनीं पुरतें समज ।
अनुभवावीण मान । हालवूं नको रे ॥ ३ ॥
सोहिरा[3] ह्मणे ज्ञानज्योती । तेथें कैचि दिवसराती ।
तयाविणें नेत्रपातीं । हालवूं नको रे ॥ ४ ॥

२१

भक्तीं आकळिला । दयाघन भक्तीं आकळिला ॥ धृ० ॥
पार्थरथीं सारथ्य करी जो । निजपद दे बळिला ॥ १ ॥

---

१ फाजीलपणाच्या गोष्टी. २ दुसऱ्याच्या पापकर्माच्या व वर्माच्या गोष्टी मात्र उत्साहानें सांगतोस ! ३ सोहिरोबा आंबिये हे गोवेकर सिद्ध होते.

प्रल्हादास्तव प्रगटुनि स्तंभीं । दानव निर्दळिला ॥ २ ॥
रुक्मिणिनें एक्या तुळसिदळानें । गिरिधरप्रभु तुळिला ॥३॥

## २२

धांव पाव सांवळे विठाबाई । कां मनिं धरिली अढी ।
अनाथ मी अपराधी स्मरतों उतरा पैलथडी ॥ विठोबा कां मनिं॥ध्रु०
एकनाथाघरिं पाणि वाहिलें गंगेच्या कावडी ।
कबिराचे ते शेले विणुनी त्यांची घालिसी घडी ॥ कां हो धरिली०॥१
सावतामाळ्याची भाजी खुडुनी त्याची बांधिसी जुडी ।
नरसीमेहेत्याची हुंडि पटवुनी त्याचा झालासी गडी ॥ कां हो०॥२॥
जनाबाइची लुगडीं धुतली चंद्रभागेच्या थडीं ।
सजनकसाई मांस विकीतो त्याची लाविसी धडी ॥ कां० ॥ ३ ॥
दामाजीपंताचे वेळीं झाला महार तांतडी ।
पायीं वाहणा हातीं काठी खांद्यावर घोंगडी ॥ कां० ॥ ४ ॥
चोखयामेळ्याचे घरीं येउनी ओढिसि ढोरें तांतडी ।
त्याची स्त्री बहु हाका मारी कोठें दिधली दडी ॥ कां० ॥ ५ ॥
गजेंद्राचा धांवा ऐकुनी वेगें घालिसी उडी ।
अर्जुनरथिं सारथ्य करूनी फेडि त्याचि सांकडीं ॥ कां० ॥ ६ ॥

१ राग, अबोला. २ भावाचा भुकेला भगवान भक्तांच्या घरीं सेवकासारखा राबतो, त्यांच्या नित्याच्या कामांतही त्यांना जातीनें साह्य करितो हें तत्त्व उदाहरणासह या प्रेमळ पदांत सांगितलें आहे. ३ संकटें. ह्या पदाचा कर्ता कोण?

२३

भक्तांचीया काजासाठीं । साधूंचीया प्रेमासाठीं
सोडिली मी लाज रे ॥ धृ० ॥
दुर्योधनसदनी गेलों । विदुराच्या गृहा आलों ।
आवडीनें कण्या प्यालों । जोंधळ्याची पेज रे ॥ भक्तां०॥
धुतों अर्जुनाचे घोडे । सदा राहें मागें पुढें ।
धर्मगृही काढिं उच्छिष्टं । बांधूनीयां माज रे ॥ भक्तां०२ ॥
वेडा गौळियांची पोरें । त्यांचें ताक प्यालों ना रे ।
खातां भिल्लिणीचीं बोरें । उच्छिष्टाची चोज रे ॥ भक्तां० ॥

२४

पार्था ते तरले ते तरले । जे नामी अनुसरले ॥ धृ० ॥
वैराग्यें गरगरले । जे चित्सुखांत कीं तरतरले ॥ १ ॥
शांतिसुखें आभरले । जैसें लवण जळीं कीं विरलें ॥ २ ॥
देवनाथिं मन मुरलें । स्वरूपब्रह्म दिठीं जग भरलें ॥ ३ ॥

२५

जय जय दत्तराज योगी । जय जय महाराज योगी ॥धृ०॥
शैली शृंगी कंथा झोली, विभूत लगाया तनमो ।
कोटि चंद्रमातेज झुलत है, चलो आपने गतमो ॥ १ ॥
शंखचक्र और त्रिशूल बिराजे, गले बडी बनमाला ।
जोगदंड अवधूत दिगंबर, बनारस रहनेवाला ॥ २ ॥

कृपा करो हम दीन रंक है, ले जाव आपनी माया ।
महादेवसुत ध्यान धरत है जब, तबही दर्शन पाया ॥३॥

२६

भज भज भव–जलधिमाजि । मनुजा शिवाला ॥ ध्रु० ॥
धरिशिल दृढ चरणकमल घडिभरि तारि करुनि विमल ।
तरिच सकल पाप शमल । त्यज रे भवाला ॥ १ ॥
सांडुनियां विषयवमन । झडकरि करि षडरिदमन ।
पूजि मन हें करुनि सुमन । गिरिजाधवाला ॥ २ ॥
सावध हो करिसि काय । शंकर गुरु बाप माय ।
चिंतुनि कविराय पाय । हृदयीं निवाला ॥ ३ ॥

२७

रत रे रत सखया ! राघवनामीं । किति रमसिल कामीं ? ।
रामनाम सुखधाम निरंतर । सेवुनियां त्यज कुमति रिकामी ॥ धृ०॥
नानाजन्मार्जित दुरितें जळलीं । कृतपुण्यें फळलीं ।
तइं या नरतनुची प्राप्ती कळली । मग मति कां चळली ? ।
लाज लाज, करि काज स्मरुनि । रघुराजपद, विरमं धनसुतधामीं।[१]
दारादिविषयांचा भ्रमकृत वारा । समजुनि मनिं थारा ।
सारा मायिकचि मोहपसारा । सारा निःसारा ।
इष्टमित्र कुळ गोत्र पुत्र सर्वथा । वृथा भ्रम काकी मामी ॥ २ ॥

---

१ धन, पुत्र व गृह यांच्या ठायीं रमूं नकोस; आसक्त होऊं नकोस.

करणें सत्संगें गतमल करणें। शुद्धांतःकरणें।
स्मरणें हित वरणें, संसृति तरणें। सत्कर्माचरणें,।
समज करुनि हित उमज मनिं देशिकवचनें कवण कसा मी ॥ ३ ॥
ऐशा साधनेंच बहुजन तरले। शांतीनें वरले।
सहज देहत्वापासुनि सरले। निजपदिं अनुसरले।
करिसि भजन तरि तरसि पितरसह येविषयीं तुज विठ्ठल हामी॥४॥

२८

श्रीरंगा, दे मजला सत्संगा आलों शरण तुला ॥ १ ॥
रघुनाथा, आवडो तव गुणगाथा आ० ॥ २ ॥
गोविंदा, सोडवि विषयछंदा आ० ॥ ३ ॥
स्वानंदा, विसरवि विषयछंदा आ० ॥ ४ ॥
श्रीकृष्णा, दूर करीं धनतृष्णा आ० ॥ ५ ॥
रघुराया, आवरी आपली माया आ० ॥ ६ ॥
गोपाळा, उघडी चिन्मयडोळा आ० ॥ ७ ॥
श्रीरामा, दे मज भजन-प्रेमा आ० ॥ ८ ॥
घनश्यामा, नेई मज निजधामा आ० ॥ ९ ॥
भगवंता, तारी विठ्ठलपंता आ० ॥ १० ॥

२९

उत्तमजन्मा येउनि रामा! गेलों मी वाया।
दुष्ट पातकी शरण मि आलों सत्वर तव पाया ॥ ध्रु० ॥

१ इंद्रियें. २ पापरहित. ३ गुरुचा उपदेश ध्यानीं धरून.

आधीं चुकलों मुकलों मी निजवेदस्वाध्याया ।
कर्मे श्रौतस्मार्त न घडलीं सद्गति साधाया ।
पुराण परिसुनि सादर झालों यशहि न तव गाया ।
स्वस्थपणें कधिं नाहिं फावलें तुजला पूजाया ॥ उ० ॥ १ ॥
आर्जविलें बहु लवणभंजनें व्याघ्रा जावाया ।
क्षुधित अतिथि कधिं नाहि घेतला प्रेमें जेवाया ।
उदार कर कधिं केला नाहीं पैसा एक द्याया ।
नाम फुकटचें तेंहि न आलें स्वामी ! वदना या ॥उ०॥२॥
कपट करुनियां निपट मांडिल्या बहुत आयाबाया ।
केली धनगृहक्षेत्रस्त्रीपशुशिशुवर बहु माया ।
नित्य सजविली वसनभूषणें निंद्या ही काया ।
सिद्ध ठेविली सदाहि रसना सज्जन निंदाया ॥उ०॥ ३ ॥
वटवट निशिदिनिं केलि चहुंकडे मन हें रमवाया ।
केलें स्नान न संध्या जपतप दुष्कृत शमवाया ।
क्षणहि न केला साधुसमागम भवदव निववाया ।
सद्यःकामुक झालों पाहुनि परधन परजाया ॥ उत्तम० ॥४॥
नाहीं विद्या कला कुशलता तुजला रिझवाया ।
शुद्ध मधुर वाणीही नाहीं तुजला विनवाया ।
बुद्धिहि नाहीं न कळे कांहीं शरणागत व्हाया ।
थकलि मजल सर्वथा दयाळा स्वहित आचराया ॥उ०॥५॥

'हरि कनवाळू कारे दीनावारे करुणेची छाया'।
निगमनगारा गर्जे ऐसा निखिला कळवाया।
यावारे विश्वासुनियां आलों जवळ तुझ्या पाया।
शुद्ध दगड हा पंत विठ्ठल स्वामी रघुराया।
उत्तम जन्मा येऊनि रामा गेलों उगा वाया॥ ६॥

३०

विश्वाचा विश्राम रे। स्वामी माझा राम रे।
आनंदाचें धाम त्याचें। गाऊं वाचे नाम रे॥ धृ०॥
चिद्रत्नाची खाण रे। एकाएकीं जाण रे।
प्राणाचाही प्राण माझा। सखया! तूझी आण रे॥ १॥
देवाचा जो देव रे। तो हा स्वयमेव रे।
अलक्ष्य लक्षुनी साक्षी। घेऊं अंगें खेव रे॥ २॥
शिवाचा आराम रे। भक्तपूर्णकाम रे।
मुक्त योगीजन गाती। जयासी निष्काम रे॥ ३॥
मिथ्या हे अनेक रे। सत्य राम एक रे।
विष्णु कृष्ण जगन्नाथ। करी हा विवेक रे॥ ४॥

३१

यादव माधव स्मरण करा रे॥ धृ०॥
दृश्य पदार्थ अशाश्वत मानुनि। चिद्रुप नेत्रिं भरा रे॥ १॥
सर्वांघटिं हरि व्यापक जाणुनि। निश्चय ठेविं बरा रे॥ २॥
माणिक म्हणे हें गुज कळण्यास्तव। सद्गुरुचरण धरा रे॥ ३॥

# ४ वरप्रसाद.

## अभंग.

१

आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा। माझिया सकळां हरिच्या दासा
कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं। ही संतमंडळी सुखी असो ॥२॥
अहंकाराचा वारा न लागो राजसा। माझ्या विष्णुदासा भाविकासी
नामा ह्मणे तया असावें कल्याण। ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥४॥

२

जेथे जेथे मन जाइल हें माझें। तेथें तेथें तुझें रूप असे ॥ १ ॥
ऐसी मज सेवा लावीं निरंतरीं। जन्मजन्मांतरीं केशीराजा ॥ २ ॥
नामा ह्मणे नको पाहों माझी लाज। संसाराचें बीज मुळ खुडीं॥३॥

३

पाहतां तुझे चरण हरली भवव्यथा। पुढती एक चिंता वाटतसे॥१
झणीं मुक्तिपद देसी पांडुरंगा। मग या संतसंगा कोठें पाहूं ॥ २ ॥
मग हे पंढरी आनंदसोहळा। कवणाचे डोळां पाहूं देवा ॥ ३ ॥
मग हे हरिकथा अमृतसंजीवनी। कवणाचे श्रवणीं ऐकों देवा ॥४॥
नामा ह्मणे मज पंढरीची सोय। अनंतजन्म होय याचिलागीं ॥५॥

४

सदा माझे डोळे जडो तुझे मूर्ती। रखुमाईच्या पती सोयरीया ॥१

१ 'कल्पना अविद्या तेणे आला जीव'–एकनाथ. २ आवडत्या भाविकाला.
३ संसार. ४ कदाचित्, मुक्तिपद देऊं नकोस हा भावार्थ.

गोड तुझें रूप गोड तुझें नाम । देईं मज प्रेम सर्वकाळ ॥ २ ॥
विठो माउलिये हाचि वर देईं । संचरोनि राहीं हृदयामाजी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कांहीं न मागें आणीक । तुझे पायीं सुख सर्व आहे ॥४

५

आतां द्यावें अभयदान । जीवन ये कृपेचें ॥ १ ॥
उभारोनी बाहो देवा । ठेवा हात मस्तकीं ॥ २ ॥
'नाभी नाभी' या उत्तरें । करुणाकरें सातविजे ॥ ३ ॥
तुका ह्मणे केली आस । तो हा दीस फळाचा ॥ ४॥

६

मज दास करी त्यांचा । संतदासांच्या दासांचा ॥ १ ॥
मग होत कल्पवरी । सुखें गर्भवास हरी ॥ २ ॥
नीचवृत्ति काम । परि मुखीं तुझें नाम ॥ ३ ॥
तुका ह्मणे सेवे । माझे संकल्प वेंचावे ॥ ४ ॥

७

हेंचि मागणें विठाबाई । पायीं ठेवूनियां डोई ॥ १ ॥
शांति दया अंतःकरणीं । रंगो रामनामीं वाणी ॥ २ ॥
मूळ द्वंद्वाचे विघडो । निजानंदीं वृत्ति जडो ॥ ३ ॥
तुका ह्मणे हरी । आतां आपुलेंसें करी ॥ ४ ॥

८

नीचपण बरवें देवा । नचले कोणाचाही हेवा ॥ १ ॥

महापूरें झाडें जाती । तेथें लव्हाळे वांचती ॥ २ ॥
येतां सिंधूच्या लहरी । नम्र होतां जाती वरी ॥ ३ ॥
तुका ह्मणे कळें । पाय धरिल्या न चले बळ ॥ ४ ॥

९

सद्गदीत कंठ दाटो । येणें फुटो हृदय ॥ १ ॥
चिंतनाचा एक लाहो । तुमच्या अहो विठ्ठला ॥ २ ॥
नेत्रीं जळ वाहो सदा । आनंदाचे रोमांच ॥ ३ ॥
तुका ह्मणे कृपादान । इच्छी मन हे जोडी ॥ ४ ॥

१०

देवा आता ऐसा करी उपकार । देहाचा विसर पाडी मज ॥ १ ॥
तरीच हा जीव सुख पावे माझा । बरें केशीराजा कळों आलें ॥२॥
ठाव देई चित्ता राखे पायापाशीं । सकळ वृत्तींशीं अखंडित ॥३॥
आस, भय, चिंता, लाज, काम, क्रोध । तोडावा संबंध यांचा माझा ४
मागणें तें एक हेंचि आहे आतां । नाम मुखीं संतसंग देई ॥ ५ ॥
तुका ह्मणे नको वरपंग देवा । घेई माझी सेवा भावशुद्ध ॥ ६ ॥

११

हेंचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥ १ ॥
गुण गाईन आवडी । हेचि माझी सर्व जोडी ॥ २ ॥

---

१ कळा, युक्ति, गुरुकिल्ली. २ छंद. ३ प्रेमाश्रूंबरोबर रजतम हे चित्तांतले दोष नाहींसे होतात व चित्त पावन होतें.

जे खळाची व्यंकटी[1] सांडो । तया सत्कर्मीं रती वाढो ।
भूतां परस्परें जडो । मैत्र जीवांचें ॥ २ ॥
दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो[2] ।
जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ ३ ॥
वर्षत सकळमंगळीं । ईश्वरनिष्ठांची मांदियाळी[3] ।
अनवरत[4] भूतळीं । भेटो तयां भूतां ॥ ४ ॥
चला[5] कल्पतरूंचे आरव[6] । चेतनां चिंतामणीचे गांव ।
बोलते जे अर्णव[7] । पीयूषाचे ॥ ५ ॥
चंद्रमे जे अलांछन[8] । मार्तंड जे तापहीन ।
ते सर्वांही सदा सज्जन । सोयरे होतु ॥ ६ ॥
किंबहुना सर्वसुखीं । पूर्ण होवोनि तिहीं लोकीं ।
भाजिजो आदिपुरुषीं । अखंडीत ॥ ७ ॥

## सार्वजनिक प्रार्थना.

स्वस्ति प्रजाभ्यः परिपालयंतां । न्याय्येन मार्गेण महीं महीशाः ।
गोब्राह्मणेभ्यः शुभमस्तु नित्यं । लोकाः समस्ताः सुखिनो भवंतु॥१॥
सर्वेऽत्र सुखिनः सन्तु सर्वे सन्तु निरामयाः ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चिद्दुःखमाप्नुयात् ॥ २ ॥
काले वर्षतु पर्जन्यः पृथिवी शस्यशालिनी ।
देशोयं क्षोभरहितो ब्राह्मणाः सन्तु निर्भयाः ॥ ३ ॥

---

१वांकडेपणा. व्यंकटेश म्हणजे वक्र किंवा दुष्ट अशांचा शास्ता. २ प्रकाशो. ३ समुदाय. ४ सर्वदा. ५ चालत्या. ६ अंकुर. ७ समुद्र. ८ कलंकरहित.

# ५ धन्यता.

## पद.

आनंदरस हा प्याला । भवताप शांतचि झाला ॥ ध्रु ॥
अनंतकोटी कल्मषपाश । पावे एका समयिं विनाश ।
दृढ धरितां सद्गुरुची कास । निजगुज सांगुनि गेला ॥ १ ॥
आतां मज हो कैचें ध्यान । विसरुनि गेलें समुळीं भान ।
श्रवण कराया नाहीं मज कान । संकल्पाचि निमाला ॥ २ ॥
मेली यद्यपि आहे माय । केला जीणें दृढ व्यवसाय ।
रामसखा तो शोकिल काय । चिन्मय होउनि ठेला ॥ ३ ॥

सखारामबुवा कवाडकर.

## अभंग.

१

आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां । तो जाहला सोहळा अनुपम्य ॥ १ ॥
आनंदें दाटलीं तिन्हीं त्रिभुवनें । सर्वात्मकपणें भोग झाला ॥ २ ॥
एकदेशीं होतों अहंकारें आथिला । त्याच्या त्यागें झाला सुकाळ हा ॥ ३ ॥
फिटलें सुतक जन्ममरणाचें । 'मी–माझ्या' संकोचें दूरी झालों ॥ ४ ॥
नारायणें दिला वसतीस ठाव । ठेवूनियां भाव ठेलों पायीं ॥ ५ ॥
तुका ह्मणे दिलें उमटूनी जगीं । घेतलें तें अंगीं लावूनीयां ॥ ६ ॥

---

१ 'मरणाही आधीं राहिलों मरोनी'–तुकाराम. २ युक्त, व्यापलेला.

२

प्रेमाच्या अमृतें रसना ओलावली। मनाची राहिली वृत्ति पायीं ॥ १ ॥
सकळही तेथें वोळलीं मंगळें। वृष्टि केली जळें आनंदाच्या ॥ २ ॥
सकळ इंद्रियें जालीं ब्रह्मरूप। ओतलें स्वरूप तयांमाजी ॥ ३ ॥
तुका ह्मणे जेथें वसे भक्तराव। तेथें नांदे देव संदेह नाहीं ॥ ४ ॥

३

याजसाठीं केला होता अट्टहास। शेवटचा दीस गोड व्हावा ॥ १ ॥
आतां निश्चिंतीनें पावलों विसांवा। खुंटलीया धावा तृष्णेचीया ॥ २ ॥
कवतुक वाटे जालिया वेचाचें। नांव मंगळाचें तेणें गुणें ॥ ३ ॥
तुका ह्मणे मुक्ति परिणिली नोवरी। आतां दिवस चारी खेळीमेळी ॥ ४ ॥

१ प्राप्त झाला.



# ४ सद्गुरुस्तव.

सद्गुरुवांचूनी सांपडेना सोय
धरावे ते पाय आधीं आधीं ॥ १ ॥

## १ अभंग.

१

श्रीगुरुमहिम्ना असतां पाठिराखा। इतरांचा लेखा कोण करी ॥ १ ॥
राजयाची कांता काय भीक मागे। मनाचिया जोगें सिद्धि पावे ॥ २ ॥
कल्पतरुतळवटीं जो कोणी बैसला। काय वाणी त्याला सांगिजोजी ॥ ३ ॥
ज्ञानदेव ह्मणे तरलों तरलों। आतां उद्धरलों गुरुकृपें ॥ ४ ॥

२

सद्गुरुनायकें पूर्ण कृपा केली। निजवस्तु दाविली माझी मज[1] ॥ १ ॥
माझें सुख मज दावियेलें डोळां। दिधली प्रेमकळा ज्ञानमुद्रा ॥ २ ॥
तया उतराई व्हावें कवण्या गुणें। जन्मा नाहीं येणें ऐसें केलें ॥ ३ ॥
नामा ह्मणे निकी दाावियेली सोय। न विसरावे पाय विठोबाचे ॥ ४ ॥

३

सद्गुरूचे पाय जीवें न विसंबावे। मन वळवावें वृत्तिसहित ॥ १ ॥
डोळियाचे डोळे उघडले जेणें। आनंदाचें लेणें लेवविलें ॥ २ ॥
जन्ममरणाचें फेडिलें सांकडें। कैवल्याचि पुढें दाखविलें ॥ ३ ॥

१ आत्मस्वरूप. ' तुझे आहे तुजपाशीं. '

मोहरलें तरु पुष्पफळभारें । तेचि निर्विकार सनकादिक ॥ ४ ॥
नामा ह्मणे स्वामी खेचर माउली । कृपेची साउली केली मज ॥ ५॥

४

श्रीपाडुरंग सद्गुरु हे स्वामी । तया पादपद्मीं नमन माझें ॥ १ ॥
ॐकारवर्णात्मक सद्गुरु पांडुरंग । अक्षय अभंग सर्वसाक्षी ॥ २ ॥
डमरू त्रिशूळ सद्गुरूच्या हातीं । दासांसी रक्षिती सर्वकाळ ॥ ३ ॥
लगाम हा देणें अश्वासी ज्यापरी । वृत्ति स्थिर करी गुरुध्यान ॥ ४॥
चमत्कार माझ्या सद्गुरुरायाचा । दासा स्वानंदाचा लाभ होय ॥५॥
एकाजनार्दनीं गुरुपदीं लीन । ब्रह्म परिपूर्ण अनुभविलें ॥६ ॥

५

ॐकारस्वरूपा सद्गुरुसमर्था । अनाथाच्या नाथा तुज नमो ॥ १ ॥
गुरुराव स्वामी आतां स्वप्रकाश । ज्यापुढें उदास चंद्र रवी ॥ २ ॥
वेदां पडलें मौन शास्त्रें वेडावलीं । वाचा हे निमाली ते श्रीगुरु ॥३॥
श्रीगुरु जयासी पाहे कृपादृष्टि । तयासी हे सृष्टी पांडुरंग ॥ ४ ॥
प्रभुराज माझा स्वामी गुरुराव । देतो मज भाव शुद्ध भूमी ॥ ५ ॥
भूमि शुद्ध करी ज्ञानबीज पेरी । अद्वैत हे धरीं मीं तूं नेणे ॥ ६ ॥
मजलागीं माझी सद्गुरु माउली । कृपा करी साउली वर्णूं काय ॥ ७ ॥
एका जनार्दनीं गुरु परब्रह्म । तयाचें पै नाम सदा मुखीं ॥ ८ ॥

६

गुरु माता गुरु पिता । गुरु आमुची कुळदेवता ॥ १ ॥

थोर पडतां सांकडं । गुरु रक्षी मागें पुढें ॥ २ ॥
काया वाचा आणि मन । गुरुचरणींच अर्पण ॥ ३ ॥
एकाजनार्दनीं शरण । गुरु एक जनार्दन ॥ ४ ॥

७

गुरुस्मरण करितां देख । स्मरणें विसरे तहानभूक ॥ १ ॥
आसनीं शयनीं भोजनीं । गुरूतें न विसंबे ध्यानीं मनीं ॥ २ ॥
गुरुसेवेची आवडी । सेवा करीं चढोवढी ॥ ३ ॥
गुरुचरणाची गोडी । एकाजनार्दनीं पायीं दडी ॥ ४ ॥

## २ गुरुपादुकाष्टक.

ज्या संगतीनेंच विराग जाला । मनोदरीचा जड भास गेला ॥
साक्षात्परात्मा मज भेटविला । विसरूं कसा मी गुरुपादुकांला ॥ १ ॥
सद्योगपंथें घरिं आणियेलें । अंगेंच मातें परब्रह्म केलें ॥
प्रचंड तो बोधरवी उदेला । विसरूं० ... .... ... ॥ २ ॥
चराचरीं व्यापकता जयाची । अखंड भेटी मजला तयाची ॥
परंपदीं संगम पूर्ण जाला । विसरूं० .... .... .... ॥ ३ ॥
जो सर्वदा गुप्त जनांत वागे । प्रपन्न भक्तां निजबोध सांगे ॥
सद्भक्तिभावाकरितां भुकेला । विसरूं० ... .... .... ॥ ४ ॥
अनंत माझ्या अपराधकोटी । नाणी मनीं घालुनि सर्व पोटीं ॥
प्रबोध करितां श्रम फार जाला । विसरूं० .... ... ॥ ५ ॥

गुरूचि ब्रह्म दावितो गुरूचि ध्यान लावितो
गुरूचि विश्व सर्व आत्मरूप हें बुझावितो ॥ ७ ॥
गुरूचि मूळदीप रे जगत् गुरुस्वरूप[1] रे
समस्त देवही तदंश दीसताति साजिरे ।
गुरूचि पूर्णसिंधु रे तयांत देव बिंदु रे
गुरु स्वयंभु सूर्य अन्य सर्वही मयूख[2] रे ॥ ८ ॥
गुरूचि दिव्य दृष्टि रे गुरूचि सर्व सृष्टि रे
गुरूचि ज्ञानबोध रे गुरूचि सर्व शोध रे ।
गुणांत तोचि विस्तरे मनांत तोचि संचरे
समस्त भूतमात्र चेष्टवोनि एकला उरे ॥ ९ ॥
गुरू विराटरूप[3] रे गुरू हिरण्यगर्भ रे
गुरूचि ॐ[4] त्रिवर्ण पंचवर्ण मुख्य तार रे
गुरूचि विश्व[5] तैजस् गुरूचि प्राज्ञ पूरुषु
गुरूविना दुजा नसे श्रुतीस घोष सर्वसु ॥ १० ॥
गुरूचि ध्येय ध्यान रे गुरूचि सर्व मान रे

१ सारें जगच गुरुस्वरूप आहे; गुरुच जगद्रूपानें नटला आहे. २ सर्व देव हे गुरुरूप सूर्याचीं किरणें आहेत. ३ विराट, हिरण्यगर्भ, अव्याकृत व मूळप्रकृति हे ब्रह्मांडाचे चार देह आहेत. ४ ॐ हा अ, उ व म असा त्रिवर्णात्मक आहे असें कोणी म्हणतात व अ, उ, म, अर्धमात्रा व बिंदु असा पंचवर्णात्मक आहे असेंही कोणी म्हणतात. तार म्ह० तारणारा प्रणव. ५ विश्व, तैजस, प्राज्ञ व प्रत्यगात्मा हे चार देहाचे ४ अभिमानी पुरुष आहेत.

नमे गुरूसमान रे जगीं गुरूस मान रे ।
गुरूचि थोर सान रे महासुखा निदान रे
गुरू गुरू गुरू गुरू करीं म्हणोनि गान रे ॥ ११ ॥

गुरुस्वरूप चिंतिजे समाधि हेचि बोलिजे
समस्त वेदपाठनाममंत्रजाप्य जाणिजे ।
यथार्थ सर्व तीर्थ सद्गुरूपदाब्जतोय हें
गुरूचि सेवणें अनेक अश्वमेधयज्ञ हें ॥ १२ ॥

नमो गुरू कृपाकरा नमो गुरू गुणाकरा
नमो गुरू परात्परा नमो गुरू महत्तरा ।
नमो गुरू सनातना नमो गुरू मनोन्मना
नमो गुरू घनाघना नमो गुरू निरंजना ॥ १३ ॥

**निरंजनमाधव.**

## ४ पदें.

१

माझी देवपुजा देवपुजा । पाय तुझे गुरुराजा ॥ ध्रु० ॥
गुरुचरणाची माती । तेचि माझी भागिरथी ॥ माझी० ॥ १ ॥
गुरुचरणाचा बिंदु । तोचि माझा क्षीरसिंधु ॥ माझी० ॥ २ ॥
गुरुचरणाचें ध्यान । तेंचि माझें संध्यास्नान ॥ माझी० ॥ ३ ॥
शिवदिनकेसरिपायीं । सद्गुरुवांचुनि दैवत नाहीं ॥ माझी० ॥

२

श्रीगुरुचें चरणकंज हृदयीं स्मरावें ॥ धृ० ॥

निगमनिखिलसाधारण सुलभाहुनि सुलभ बहू ।
इतर योगयागविषमपंथिं कां शिरावें ? ॥ १ ॥

नरतनुदृढनावेसी बुडवुनि अतिमूढपणें ।
दुष्ट नष्ट कुकरसुकरतनु कां फिरावें ? ॥ २ ॥

**रामदास** विनवी तुज अजुनि तरी समज उमज
विषयवीष पेउनियां फुकट कां मरावें ॥ ३ ॥

झाल्यें बाई! वेडी । दरबार गुरूचा झाडी ॥ धृ० ॥

देहपीतांबर फाडिला । नवरत्नांचा हार काढिला ।
सद्गुरूचे गळां घातला । वासना सोडी ॥ दरबार० ॥ १ ॥

कल्पनाकांचोळी काढिली । त्रिगुणाची वेणि सोडिली ।
चारि देहांची मुक्ति साधिली । परी ती थोडी ॥ दर० ॥२॥

वेडी झाल्यें सद्गुरुघरचीं । चिंता हारपली मनाची ।
सोय दाखविली स्वस्वरुपाची । लागली गोडी ॥ दर० ॥३॥

चिन्मयस्वरूप दाखवीलें । आपणांमध्यें मेळवीलें ।
**पूर्णानंद** गुरूनें केलें । पाय ना सोडी ॥ दर० ॥ ४ ॥

# ४ संतमाहात्म्य.

सर्वभूतेषु यः पश्येद्भगवद्भावमात्मनः ।
भूतानि भगवत्यात्मन्येष भागवतोत्तमः ॥ ४५ ॥
—श्रीमद्भागवत स्कंध ११ अ० २.

श्लोक.

प्रल्हादनारदपराशरपुंडरीक— ।
व्यासाम्बरीषशुकशौनकभीष्मदाल्भ्यान् ॥
रुक्मांगदार्जुनवसिष्ठबिभीषणादीन् ।
पुण्यानिमान्परमभागवतान्स्मरामि ॥ १ ॥

अभंग.

१

हरिभक्त मत झाले हो अनेक । त्यामाजी निष्टंक काही एक ॥ १ ॥
शुक वामदेव शौनक नारद । अजामेळ प्रल्हाद बिभीषण ॥ २ ॥
ध्रुव पराशर व्यास पुंडलीक । अर्जुन वाल्मीक अंबरीष ॥ ३ ॥
रुक्मांगद भीष्म बगदाल्भ्य सूत । मित्री हनुमंत परिक्षिती ॥ ४ ॥
कश्यपादि अत्री गौतम वशिष्ठ । भारद्वाज श्रेष्ठ मार्कंडेय ॥ ५ ॥
बळी कृपाचार्य इंद्रसूर्यचंद्र । ब्रह्माआदि रुद्र पूर्णभक्त ॥ ६ ॥
सर्वांचा हो एक आहे मी किंकर । म्हणे ज्ञानेश्वर वैष्णवांसी ॥ ७ ॥

२

भक्तांमाजी अग्रगणी । पुंडलीक महामुनी ॥ १ ॥

१ निश्चयाचे. २ सर्व भगवद्भक्त, केवळ विष्णुभक्तच नव्हत.

त्याचे प्रसादें तरले । साधुसंत उद्धरले ।। २ ।।
तोचि प्रसाद आम्हांसी । विटेवरी हृषीकेशी ।। ३ ।।
पुंडलीक बापमाय । दासी जनी वंदी पाय ।। ४ ।।

३

निवृत्ति ज्ञानदेव सोपान मुक्ताबाई एकनाथ नामदेव तुकाराम ।।
आवडीनें ही नामें गातां ते नर पावति मंगलधाम ।। १ ।।

( स्वकृत )

रामदास जयराम रंगनाथ केशव आनंदमूर्ति बरे ।।
आवडिनें सन्नामें गातां ते नर होती दास खरे ।। २ ।।
या लोकीं जे झाले असती भक्त हरीचे आवडते ।
ते केवळ हरिरूप तयांचीं नावें घेणें आवडतें ।। ३ ।।

४

" माझे भक्त मज अनुसरलें चित्तें। त्याहूनी पंढियंत मज आणिक नाहीं ।।
व्यक्तीस येणें मज तयांचिये आवडी । युगायुगीं प्रौढी हेचि मिरवी ।। २ ।।
त्यांचेनी कृतार्थ असें मी पूर्णकाम । ते माझे परम प्राणसखे ।। ३ ।।
ते माझे आश्रमी मी त्यांचा विश्राम । जिहीं रूपनाम केलें मज ।। ४ ।।
मी त्यांचा सोयरा ते माझे सांगाती । करी त्या एकांती सुखगोष्टी ५।
जिहीं तनुमनप्राण लाविला मजकडे । मी तया आवडे जीवाहूनी।। ६।।
ते माझे भाग्याचे अधिकारी विभागी । वैकुंठ त्यांलागीं वसतें केलें ।।७
त्यांचें गुणगौप्य मीचि एक जाणें । माझी प्रेमखूण कळली तयां।। ८।।

१ हें पांडुरंगाचें नामदेवाशीं भाषण आहे. ' तीर्थावळी ' पहा. २ प्रिय.

मनाची साउली करूनियां मातें । भोगिती आतां तें सर्वसुख ॥९॥
आपुलियाचि किरणें विराजे गभस्ती । परी किरण न होती आन जेवीं ॥
तैसे माझे दास मजमाजी उदास । असती समरस दुर्जेनवीण ॥११
मी तों भक्तरूप भक्त माझें स्वरूप । प्रभा आणि दीप जयापरी १२
हे गुण अनुभवी जाणती ते ज्ञानी । ज्यां नाहीं आयणी कासयाची ॥
त्याचिये चरणींचें रज माझें नाम । जें गाइिलें रजतमें सत्वशीळ १४
त्यांचे भेटीलागीं हृदय कळवळे । के देखोन डोळे निवती माझे"१५

५

ब्रह्ममूर्ति संत जगीं अवतरले । उद्धराया आले दीनजनां ॥ १ ॥
ब्रह्मादिक त्याचें वंदिती पायवणी । नाम घेतां वदनीं दोष जाती ॥
हो का दुराचारी विषयीं आसक्त । संतकृपें त्वरित उद्धरतो ॥३॥
अखंडित नामा त्याची वाट पाहे । निशिदिनीं ध्याये सत्संगती ४

६

उदार तुम्ही संत । मायबाप कृपावंत ॥ १ ॥
केवढा केला उपकार । काय वानूं मी पामर ॥ २ ॥
जड जीवां उद्धार केला । मार्ग दाविला सुपंथ ॥ ३ ॥
सेना म्हणे उतराई । होतां कांहीं दिसेना ॥ ४ ॥

७

तेचि एक संत जाणा । नारायणा आवडती ॥ १ ॥

१ एकात्मतेच्या भावानें अभिन्नपणानें मज भजतात. २ तत्त्वनिर्ण-येच्छा, ज्यांची जिज्ञासा पूर्ण झाली आहे. ३ पायाचें तीर्थ.

पांडुरंगावांचुनि कांहीं । न जाणे पाहीं दुसरें ॥ २ ॥
मुखीं नाम अमृतवाणी । धाले मनीं डुलती ॥ ३ ॥
**सेना** ह्मणे पायीं माथा । त्यांच्या आतां ठेविला ॥ ४ ॥

८

संता पोटीं देव वसे । देवा पोटीं संत असे ॥ १ ॥
ऐसा परस्परें मेळा । देव संतांचा अंकिला ॥ २ ॥
संतांठायीं देव तिष्ठे । देव तेथें संत वसे ॥ ३ ॥
**एकाजनार्दनी** संत । देव तयाचा अंकीत ॥ ४ ॥

९

संत जाती हरिकीर्तना । त्यांचे वाहिन मी च वाहणा ॥ १ ॥
हेचि भवसिंधूचें तारूं । येणें उतरूं पैलपारू ॥ २ ॥
जन्मोजन्मींचें भेषज । तें हे संतचरणरज ॥ ३ ॥
संतचरणींच्या पादुका । झाला जनार्दनी **एका**

१०

संतांचिये माथा चरणांवरी माझा । देहीं भाव दुजा नाहीं नाहीं ॥ १ ॥
नामाचें चिंतन करिती सर्वकाळ । ते माझे केवळ मायबाप ॥ २ ॥
मायबाप ह्मणों तरि लाजिरवाणें । चुकविलें येणें संतजनीं ॥ ३ ॥
ज्या ज्या जन्मा यावें मायबाप दोनी । परी संत निर्वाणी मिळतीना ॥ ४ ॥
येचि देहीं डोळां संतांसी देखिलें । **एकाजनार्दनीं** वंदिले चरण त्यांचे ५

११

विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेदभ्रम अमंगळ ॥ १ ॥

आइकाजी तुम्ही भक्त भागवत । कराल तें हित सत्य करा ॥ १ ॥
कोणाही जीवाचा न घडो मत्सर । वर्म सर्वेश्वरपूजनाचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे एका देहाचे अवयव । सुखदुःख जीव भोग पावे ॥ ४ ॥

१२

काय या संताचे मानूं उपकार । मज निरंतर जागवीती ॥ १ ॥
काय देवा यासी व्हावें उतराई । ठेविता हा पायीं जीव थोडा ॥२॥
सहज बोलणें हितउपदेश । करूनी सायास शिकवीती ॥ ३ ॥
तुका ह्मणे वत्स धेनुचिये चित्तीं । तैसें मज येती सांभाळीत ॥ ४ ॥

१३

जाणे भक्तीचा जिव्हाळा । तोचि देवाचा पुतळा ॥ १ ॥
आणिक न ये माझ्या मना । हो कां पंडित शाहणा ॥ २ ॥
नामरूपीं जडलें चित्त । त्याचा दास मी अंकित ॥ ३ ॥
तुका ह्मणे नवविध । भक्ति जाणे तोचि शुद्ध ॥ ४ ॥

१४

उजळलें भाग्य आतां । अवघी चिंता वारली ॥ १ ॥
संतदर्शनें हा लाभ । पद्मनाभ जोडला ॥ २ ॥
संपुष्ट हे हृदयपेटी । करूनि पोटीं सांठवूं ॥ ३ ॥
तुका ह्मणे होता ठेवा । तो या भावा सांपडला ॥ ४ ॥

१५

वीर विठ्ठलाचे गाढे । कळिकाळ पायां पडे ॥ १ ॥

कारिती घोष जयजयकार । जळती दोषांचें डोंगर ॥ २ ॥
क्षमा दया शांति । बाण अभंग हे हातीं ॥ ३ ॥
तुका ह्मणे बळी । तेचि एक भूमंडळीं ॥ ४ ॥

१६

संतांचिये गांवीं प्रेमाचा सुकाळ । नाहीं तळमळ दुःखलेश ॥ १ ॥
तेथें मी राहीन होऊनि याचक । घालितील भीक तेचि मज ॥ २ ॥
संतांचिये गांवीं वैरो भांडवल । अवघा विठ्ठल धन वित्त ॥ ३ ॥
संतांचें भोजन अमृताचें पान । करिती कीर्तन सर्वकाळ ॥ ४ ॥
संतांचा उदीम उपदेशाचा पेठ । प्रेमसुखसाटी देती घेती ॥ ५ ॥
तुका ह्मणे तेथें आणिक नाहीं परी । ह्मणोनि भिकारी झालों त्याचा॥ ६

१७

काय वाणूं आतां न पुरे हे वाणी । मस्तक चरणीं ठेवीतसे ॥ १ ॥
थोरीव सांडिली आपुली परीसें । नेणे शिवों कैसें लोखंडासी ॥ २ ॥
जगाच्या कल्याणा संतांच्या विभूती । देह कष्टवीती उपकारें ॥ ३ ॥
भूतांची दया हें भांडवल संतां । आपुलिया ममता नाहीं देहीं ॥ ४ ॥
तुका ह्मणे सुख पराविया सुखें । अमृत हें मुखें स्रवतसे ॥ ५ ॥

१८

जे कां रंजले गांजले । त्यासी ह्मणे जो आपुले ॥ १ ॥

---

१ पुष्कळ. २ सवदा, साटलोट. ३ प्रकार ४ परीस आपला मोठेपणा विसरून लोहास शिवून त्याचें सोनें करितो, तसें संत दयेनें पतितांचेही सोनें करितात । ५ संत परसुखें सुखावतात व मुखें अमृत स्रवतात.

तोचि साधु ओळखावा । देव तेथेंची जाणावा ॥ २ ॥
मृदु सबाह्य नवनीत । तैसें सज्जनाचें चित्त ॥ ३ ॥
ज्यासी आपगिलां नाहीं । त्यासी धरी जो हृदयीं ॥ ४ ॥
दया करणें पुत्रासी । तेचि दासा आणि दासी ॥ ५ ॥
तुका ह्मणे सांगों किती । तोचि भगवंताची मूर्ती ॥ ६ ॥

१९

भक्त ऐसे जाणा जे देहीं उदास । गेले आशापाश निवारूनी ॥ १ ॥
विषय तो त्यांचा झाला नारायण । नावडे जन धन मातापिता ॥ २ ॥
निर्वाणीं गोविंद असे मागें पुढें । कांहींच सांकडें पडों नेदी ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्यकर्मा व्हावें साह्य । असत्यासी भय नरका जाणें ॥४॥

२०

ज्यासी माता परनारी । त्याचे मुखीं खरा हरी ॥ १ ॥
केलें पोटासाटीं ढोंग । तेथें कैचा पांडुरंग ? ॥ २ ॥
ज्याला परधन विष । तोचि खरा हरिदास ॥ ३ ॥
तुका ह्मणे सत्य सत्य । कृष्णपायांची शपथ ॥ ४ ॥

२१

अंतरीं निर्मळ वाचेचा रसाळ । त्याचे गळां माळ असो नसो ॥ १ ॥
आत्मा-अनुभवीं चोखाळिल्या वाटा । त्याचे माथां जटा असो नसो २
परस्त्रीचे ठायीं जो कां नपुंसक । त्याचे अंगा राख असो नसो ॥ ३ ॥
परद्रव्या अंध निंदेसी जो मुका । तोचि संत देखा तुका ह्मणे ॥ ४ ॥

१रक्षिता, पोशिंदा. २'कनककांता नये चित्ता । तोची परमार्थ पुरता'—रामदास.

मृत्तिकेवरी कुलाळें घट कोंदुनि आणाविलासे ।
रंगला या **निजरंगीं** निरतिशय सदनिं विलासे ॥ ३ ॥

४

संतसमागम काशी रे ! । क्षणभर वस्तिसिं जाशी रे ! ।
हरती पातकराशी रे ! । पावसि ब्रह्मपदासी रे ! ॥ ध्रु० ॥
गुरुचरणीं मन ठेवुनियां । भजनरसायण सेवुनियां ।
चिन्मय लेणें लेउनियां । राहति तन्मय होउनियां ॥ १ ॥
गुरुचरणींचा वासी रे ! । समाधि त्याची दासी रे ! ।
पदोपदीं त्या काशी रे ! । बोले **केशव** जोशी रे ! ॥ २ ॥



# ५ नामसंकीर्तन.

रामकृष्णमंत्र जनांसी उद्धार।
आणीक साचार मार्ग नाहीं ॥ १ ॥

--निवृत्तिनाथ.

चहूं वर्णास नामाधिकार। नामीं नाहीं लहान थोर।
जड मूढ पैलपार। पावती नामें ॥ १ ॥

—रामदास.

कल्याणानां निधानं कलिमलमथनं पावनं पावनानां
पाथेयं यन्मुमुक्षोः सपदि परपदप्राप्तये प्रस्थितस्य।
विश्रामस्थानमेकं कविवरवचसा जीवनं सज्जनानां
बीजं धर्मद्रुमस्य प्रभवतु भवतां भूतये रामनाम ॥ १ ॥

गोविंदेति सदा स्नानं गोविंदेति सदा जपः।
गोविंदेति सदा ध्यानं सदा गोविंदकीर्तनं ॥ २ ॥

हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनम्।
कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा ॥ ३ ॥

हरिर्हरति पापानि दुष्टचित्तैरपि स्मृतः।
अनिच्छयापि संस्पृष्टो दहत्येवहि पावकः। ४ ॥

अच्युतानंतगोविंदनामोच्चारणभेषजात्।
नश्यंति सकला रोगाः सत्यं सत्यं वदाम्यहम् ॥ ५ ॥

जिव्हे कीर्तय केशवं मुररिपुं चेतो भज श्रीधरं
पाणिद्वंद्व समर्चयाच्युतकथां श्रोत्रद्वयं त्वं शृणु ।
कृष्णं लोकय लोचनद्वय हरेर्गच्छांघ्रियुग्मालयं
जिघ्र घ्राण मुकुंदपादतुलसीं मूर्धन्नमाधोक्षजम् ॥ ६ ॥

## अभंग.

१

गोपाळारे तुझें ध्यान लागो मना ।
आनु न विसंबे हरि जगत्रजीवना ॥ १ ॥
सोनियाचा दिवस आजि अमृतें पाहला ।
नाम आठवितां रूपीं प्रगट पैं झाला ॥ २ ॥
तनु मनु शरण विनटलें तुझ्या पाईं ।
रखुमादेवीवरावांचूनि आनु नेणें कांहीं ॥ ३ ॥

२

रामकृष्ण नामें ये दोन्हीं साजिरीं । हृदयमंदिरीं स्मरे कां रे ॥ १ ॥
आपुली आपण करा सोडवण । संसारबंधन तोडा वेगीं ॥ २ ॥
ज्ञानदेवा ध्यानीं रामकृष्णमाळा । हृदयीं जिव्हाळा श्रीमूर्ति रया ॥३॥

३

हरि आला रे हरि आला रे । संतसंगें ब्रह्मानंदु जाला रे ॥ ध्रु० ॥
हरि येथें हरि तेथें रे । हरिवांचूनि न दिसे रितें रे ॥ १ ॥
हरि पाहीं रे हरि ध्याई रे । हरिवांचूनि दुजें नाहीं रे ॥ २ ॥

हरि वाचे रे हरि नाचे रे । हरि पाहतां आनंदु सांचे रे ॥ ३ ॥
हरि आदीं रे हरि अंतीं रे । हरि व्यापक सर्वांभूतीं रे ॥ ४ ॥
हरि जाणा रे हरि वाना रे । बापरखुमादेवीवरु राणा रे ॥ ५ ॥

४

मुक्तामुक्त दोन्ही नाइकतों कर्णीं । हरिनामपर्वणी सदा काळ ॥ १ ॥
नाहीं काळ तेथें आम्हां वेळ कैंचीं । हरिनामछंदाची गोडी थोरी ॥२॥
नाना विघ्नबाधा नाइकों आम्ही कदा । निरंतर धंदा रामकृष्ण ॥ ३ ॥
मुक्तपणें मुक्त मुक्ताई पै रत । हरिनाम स्मरत सर्वकाळ ॥ ४ ॥

५

नाम मुखीं सदा तोचि पै भाग्याचा । तयासी यमाचा धाक नाहीं ॥१॥
रामनाम हरी सर्वकाळ वसे । तेथेंचि निवासे वसे हरी ॥ २ ॥
हरिध्यान वसे अखंड पै सर्वदा । न पवे तो आपदा इये जनीं ॥३॥
निवृत्ति समता हरिभजन करीं । सर्वत्र कामारी रिद्धिसिद्धि ॥ ४ ॥

६

नित्य हरिकथा नित्य नामावळी । वैष्णवाचे कुळीं धन्य जन्म ॥ १ ॥
ब्रह्मणोनी पंढरीं उपजावें संसारीं । प्रत्यक्ष श्रीहरी तीरीं उभा ॥ २ ॥
नित्यता दिवाळी नाहीं तेथें द्वैत । नित्यता अद्वैत तिष्ठतसे ॥ ३ ॥
निवृत्ति सादर विष्णुमय सार । विठ्ठल आचार पंढरीये ॥ ४ ॥

७

मनाचे मवाळ[1] हरिरूप चिंतिती । रामकृष्णमूर्ती नित्यकथा ॥ १ ॥

१ कोमळ.

रामकृष्णध्यान सदा पैं सर्वदा । न पवेल आपदा नानायोनी ॥२॥
हरिध्यानजप मुक्त पैं अनंत । जीवशीवीं रत सर्वकाळ ॥ ३ ॥
सोपान प्रेमाचा आनंद हरीचा । तुटला मोहाचा मोहपाश ॥ ४ ॥

८

काळवेळ नसे नामसंकीर्तनीं । उंच नीच योनी हेंही नसे ॥ १ ॥
धरा नाम कंठीं सदासर्वकाळ । मग तो गोपाळ सांभाळील ॥ २ ॥
कृपाळु कोंवसो सुखाचा सागर । करील उद्धार भाविकांसी ॥ ३ ॥
नामा ह्मणे फार सोपें हें साधन । वाचें नाम घेणें इतुकेंची ॥ ४ ॥

९

सकळ साधनांचें सार । रामकृष्ण हा उच्चार ॥ १ ॥
ह्मणा गोविंद नरहरी । सकळ जीवां तोचि तारी ॥ २ ॥
नाम घेतां हरि माधव । तरताती सकळ जीव ॥ ३ ॥
नामा ह्मणे केशवाचे । धन्य जीवित वैष्णवांचें ॥ ४ ॥

१०

नाम फुकट चोखट । नाम घेतां नये वीट ॥ १ ॥
जड शिळा ज्या सागरीं । आत्माराम नामें तारी ॥ २ ॥
पुत्रभावें स्मरण केलें । तया वैकुंठासी नेलें ॥ ३ ॥
नाममहिमा जनी जाणे । ध्यातां विठ्ठलची होणें ॥ ४ ॥

११

नामें दोष जळती । नामें पापी उद्धरती ॥ १ ॥

---

१ पावेल, प्राप्त होईल. २ आधार. ३ श्रीराम.

हें तों आलें अनुभवा । सत्य जीवा प्रत्यया ॥ २ ॥
नामें अपार तारिले । नामें जीवन्मुक्त केले ॥ ३ ॥
कान्हुपात्रा नाम घेतां । पायीं जडली तत्वतां ॥ ४ ॥

१२

नामाचिया बळें न भीऊं सर्वथा । कळिकाळाच्या माथां सोटे मारूं ॥१॥
वैकुंठीचा देव आणूं या कीर्तनीं । विठ्ठल गाउनी नाचों रंगीं ॥ २ ॥
सुखाचा सोहळा करूनी दिवाळी । प्रेमें वनमाळी चित्तीं धरूं ॥३॥
सावता म्हणे ऐसा भक्तिमार्ग धरा । तेणें मुक्ति द्वारां वोळंगती ॥४॥

१३

अवघाचि नेथें नामाचें चिंतन । याहुनी साधन आणीक नाहीं ॥ १ ॥
जोडधील मज भक्ताचा कैवारी । प्रतिज्ञा निर्धारीं केली आम्हीं ॥ २ ॥
गुणदोषयाती न विचारी काहीं । धावे लवलाहीं भक्तकाजा ॥ ३ ॥
अवघे काळीं वाचे म्हणा नारायण । सेना म्हणे क्षण जाऊं न द्या ४

१४

नाम फुकाचें फुकाचें । देवा पंढरिरायाचें ॥ १ ॥
नाम अमृत हें सार । हृदयीं जपा निरंतर ॥ २ ॥
नाम संताचें माहेर । प्रेमसुखाचें आगर ॥ ३ ॥
नाम सर्वामध्यें सार । जपे नरहरि सोनार ॥ ४ ॥

१५

नाम वदतां हे वैखरी । चित्त धांवे विषयांवरी ॥ १ ॥
कैसें होताहे स्मरण । स्मरणामाजी विस्मरण ॥ २ ॥

नामरूपा[1] नाहीं मेळ । नुसता वाचेचा गोंधळ ॥ ३ ॥
एका जनार्दनीं नाम । नामी प्रकटे आत्माराम[2] ॥ ४ ॥

१६

नाम मुखीं गातां विषयाची वार्ता । नोहेचि सर्वथा गातयासी ॥ १ ॥
नाम तें पावन नाम तें पावन । नामावांचून जाण श्रेष्ठ कोण ॥ २ ॥
एकाजनार्दनी नाम तें पावन । त्रिभुवनीं मंडन नाम सत्य ॥ ३ ॥

१७

नामधारक हो कां भलता । त्याचे चरणीं ठेविन माथा ॥ १ ॥
न ह्मणे उत्तम अधम । मुखी जपतां रामनाम ॥ २ ॥
यातिकुळाचें कारण । नाहीं नाहीं नामाविण ॥ ३ ॥
नाम जपे तोचि श्रेष्ठ । एका जनार्दनीं वरिष्ठ ॥ ४ ॥

१८

वाचे विठ्ठल बोलावें । मग पाऊल टाकावें[3] ॥ १ ॥
ऐसा ज्यांचा नेमधर्म । मुखीं विठ्ठलाचें नाम ॥ २ ॥
सर्वकाळ वाचे । विठ्ठलनाम वदती साचें ॥ ३ ॥
कुळधर्म आमुचा । ह्मणे एका जनार्दनाचा ॥ ४ ॥

१०

रामनामकथागंगा । स्मरणें पावन करी जगा ॥ १ ॥

१ ज्याचे ध्यान करायचे तदाकार चित्तवृत्ति झाली पाहिजे. २ नाथ ह्मणतात, ‘मी नामस्मरण करितों तेव्हां साक्षात परमात्मा प्रकटतो.’ ३ भक्तांचा शुभ मुहूर्त हाच ! मंगलांच्या मंगलाला चित्तीं चिंतणाऱ्यांना अमंगळ कांहींच नाहीं !

तिर्थी प्रेमपूर आला । शंकरहृदयीं सामावला ॥ २ ॥
रामदासाची माउली । आळशावरी गंगा आली ॥ ३ ॥

२०

धन्य धन्य तें नगर । जेथें कथा निरंतर ॥ १ ॥
गुण गाती भगवंताचे । तेचि मानावे देवाचे ॥ २ ॥
स्वयें बोले जगजीवन । थोर कलियुगीं कीर्तन ॥ ३ ॥
रामदास म्हणे भले । हरिभक्तीं उद्धरले ॥ ४ ॥

२१

अमृतरस घेई काढा । तेणें पीडा वारेल ॥ १ ॥
पथ्य नाम विठोबाचें । आणिक जिव्हे न सेवीं ॥ २ ॥
भवरोगा ऐसें जाय । आणिक काय क्षुल्लकें ! ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे बाधा । आणिक कदा भूताची ॥ ४ ॥

२२

नष्ट भवरोग । संचितक्रियमाणभोग ॥ १ ॥
ऐसें विठोबाचें नाम । उच्चारितां खंडे जन्म ॥ २ ॥
वसों न सके पाप । पळे त्रिविध तो ताप ॥ ३ ॥
तुका म्हणे माया । होय दासी, लागे पायां ! ॥ ४ ॥

२३

हरिकथे नाहीं । विश्वास ज्याचे ठायीं ॥ १ ॥
त्याची वाणी अमंगळ । कान उंदराचें बीळ ॥ २ ॥

सांडूनी हा रस । करिती आणिक सायास ॥ ३ ॥
तुका म्हणे पिसीं । वायां गेलीं किती ऐसीं ! ॥ ४ ॥

२४

नाम घेतां नलगे मोल । नाममंत्र नाहीं खोल ॥ १ ॥
दोंचि अक्षरांचें काम । उच्चारावा रामराम ॥ २ ॥
नाहीं वर्णधर्मयाती । नामीं अवघींच सरतीं ॥ ३ ॥
तुका म्हणे नाम । चैतन्य[1]निजधाम ॥ ४ ॥

२५

राम म्हणे ग्रासोग्रासीं । तो जेविला उपवासी ॥ १ ॥
धन्य धन्य तें शरीर । तीर्थव्रतांचें माहेर ॥ ध्रु० ॥
राम म्हणे करितां धंदा । सुखसमाधी त्या सदा ॥ २ ॥
राम म्हणे वाटचाली । यज्ञ पाउलापाउलीं ॥ ३ ॥
राम म्हणे भोगीं त्यागीं । कर्म न लिंपे त्या अंगीं ॥ ४ ॥
राम राम जपे नित्य । तुका म्हणे जीवन्मुक्त ॥ ५ ॥

२६

नामसंकीर्तन साधन पैं सोपें । जळतील पापें जन्मांतरिंचीं ॥ १ ॥
नलगे सायास जावें वनांतरा । सुखें येतो घरा नारायण ॥ २ ॥
ठायींच बैसोनी करा एकचित्त । आवडी अनंत आळवावा ॥ ३ ॥
रामकृष्ण हरी विठ्ठल केशवा । मंत्र हा जपावा सर्वकाळ ॥ ४ ॥

१ देवाचें घर. २ ' हरी-चिंतनीं अन्न सेवीत जावें '—रामदास.

याचीण आणीक नाहीं पैं साधन । वाहातसे आण विठोबाची ॥५॥
तुका म्हणे सोपें आहे सर्वांहूनी । शहाणा तो धणी घेतो तेथें ॥६॥

२७

बैसोनी निवांत शुद्ध करीं चित्त । तया सुखा अंतपार नाहीं ॥१॥
येऊनी अंतरीं राहील गोपाळ । सायासाचें फळ बैसलीयां ॥ २ ॥
राम कृष्ण हरी मुकुंद मुरारी । मंत्र हा उच्चारी वेळोवेळां ॥ ३ ॥
तुका म्हणे ऐसें देईन मी दिव्य । जरी होईल भाव एकविध ॥४॥

२८

रामनामाचे पोवाडे । नित्य ज्याची वाचा पढे ॥ १ ॥
धन्य तो एक संसारीं । रामनाम जो उच्चारी ॥ २ ॥
रामनाम गर्जे वाचा । काळ आज्ञाधारक त्याचा ॥ ३ ॥
तुका म्हणे रामनामीं । कृतकृत्य झालों आम्हीं ॥ ४ ॥

---

## वामनी श्लोक.

अहो येतां जातां उठत बसतां कार्य करितां ।
सदा देतां घेतां वदनिं वदतां ग्रास गिळितां ।
घरीं दारीं शय्येवरि रतिसुखाचे अवसरीं ।
समस्तांची लज्जा त्यजुनि भगवच्चिंतनें करीं ॥ २७ ॥
नको याग मांडूं; नको प्राण कोंडूं;
नको द्रव्य, दारा, घरें, भोग सोडूं।

१ तृप्ति, सुख. २ नामस्मरणाला काळ वेळ नाहीं. ३ अंतरंगें नाम बोलावें.

नका कष्टुनी पर्वताग्रीं तपाला
मुखीं रामचंद्र स्मरा वेळोवेळां ॥ २८ ॥

हरिचरणसरोजीं चित्सुधासारपानें[1]
भ्रमर परमयोगी गुंजती नामगानें ।
हरति सकळ दुःखें, हीं सुखाचीं निधानें[2]
वद वद वद जिव्हे ! रामनामें रसानें[3] ॥ २९ ॥

न कळतां पद अग्निवरी पडे
न करि दाह असें न कधीं घडे ।
अजितनाम वदो भलत्यां मिसें[4]
सकळ पातक भस्म करीतसे ॥ ३० ॥

न जाणतहि ये मुखा हरि तथापि पापं हरी
स्मरोनि महिमा स्मरे वदनिं तींच नामें जरी ।
प्रवृत्तिविषयीं जरी असति त्या जनांचीं मनें
विरक्त करितो हरि स्वगुणनामसंकीर्तनें ॥ ३१ ॥

१ ज्ञानामृतपानानें. २ घरें, आगरें. ३ प्रीतीनें ४ कोणत्याही निमित्तानें.



# ८ परमार्थविचार.

## १ प्रपंचाची असारता.

काळ जात थिरल्या बहु पाळीं । पामरा तुज कशी निज आली ! ॥
भाग जाग स्वरूपा लवलाह्या । जातसे वय अमोलिक वायां ॥ १ ॥

१

जन हे सुखाचे दिल्या घेतल्याचे । या अंतकाळींचें नाहीं कोणी ॥ १ ॥
झाल्या हीन शक्ति नाकडोळे गळती । सांडोनियां पळती गडापोरें ॥२
बाइल म्हणे खर मरता तरी बरें । नासलें हें घर थुंकोनीयां ! ॥ ३ ॥
तुका म्हणे माझीं न होत हीं कोणी । तुज चक्रपाणिवाचोनियां ॥४॥

२

सुखाचे सांगाती सर्वही मिळती । दुःख होतां जाती निघोनियां॥१॥
निघोनियां जाती संकटाचे वेळे । सुख होतां मिळे समुदाय ॥ २ ॥
समुदाय सर्व देहाचे संबंधी । तुटली उपाधी रामदासीं ॥ ३ ॥

३

काळ जातो क्षणक्षणा । मूळ येईल मरणा ॥ १ ॥
काहीं धांवाधाव करी । जंव तो काळ आहे दुरी ॥ २ ॥
देह आहे जाईजणें । भुललासि कवण्या गुणें ॥ ३ ॥
मायाजाळीं गुंतलें मन । परि हें दुःखासी कारण ॥ ४ ॥
सत्य वाटतें सकळ । परी जातां नाहीं वेळ ॥ ५ ॥
रामीरामदास म्हणे । आतां सावधान होणें ॥ ६ ॥

४

देह तंव असे भोगाचे आधीन । याचें सुख शीण क्षणभंगुर ॥ १ ॥
अविनाश जोडी देवापाशीं भाव । कल्याणाचा ठाव सकळही ॥ २ ॥
क्षणभंगुर हा येथील पसारा । आलिया आकारा अवघे नासे ॥ ३ ॥
तुका ह्मणे येथें सकळ विश्रांती । आठवावा चित्तीं नारायण ॥ ४ ॥

५

हेचि थोर भक्ती आवडती देवा । संकल्पावी[1] माया संसाराची ॥ १ ॥
ठेविलें अनंतें तैसेंची रहावें । चित्तीं असों द्यावें समाधान ॥ २ ॥
वाहिल्या उद्वेग दुःखाचि केवळ । भोगणें तें फळ संचिताचें ॥ ३ ॥
तुका ह्मणे घालूं तयावरी भार । वाहूं हा संसार देवापायीं ॥ ४ ॥

६

जोडोनियां धन उत्तम वेव्हारें । उदासविचारें वेंच करी ॥ १ ॥
उत्तमची गती तो एक पावेल । उत्तम भोगील जीवखाणी ॥ २ ॥
परउपकारी नेणें परनिंदा । परस्त्रिया सदा बहिणीमायी ॥ ३ ॥
भूतदया गाईपशूंचें पाळण । तान्हेल्या जीवन वनामाजी ॥ ४ ॥
शांतिरूपें नव्हे कोणाचा वाईट । वाढवी महत्व वडिलांचें ॥ ५ ॥
तुका ह्मणे हेंचि आश्रमाचें फळ । परम पद बळ वैराग्याचें ॥ ६ ॥

---

१ संसाराविषयींची ममता सोडून तिचा संकल्प ईश्वराकडे करावा, ह्मणजे आपल्या संसाराचा भार ईश्वरावर सोंपवून आपण फक्त त्याचे गुमास्ते आहोंत असें समजावें, व स्त्रीपुत्रादिकांचा पोषिंदा तो आहे अशी दृढ श्रद्धा धरावी.

७

क्षणक्षणा हाचि करावा विचार । तरावया पार भवसिंधु ॥ १ ॥
नाशिवंत देह जाणार सकळ । आयुष्य खातो काळ सावधान ॥ २ ॥
संतसमागमीं धरूनी आवडी । करावी तांतडी परमार्थी ॥ ३ ॥
तुका म्हणे इहलोकींच्या वेव्हारें । नये डोळे धुरें भरूनि राहों ॥४॥

८

ऐसें असावें संसारीं । जोंवरि प्राचीनाची दोरी ॥ १ ॥
पक्षी आंगणासी आले । आपुला चारा चरोनि गेले ॥ २ ॥
मुलीं घरचार मांडिला । खेळ मोडोनी टाकिला ॥ ३ ॥
वाटसरू वाटा आले । प्रातःकाळीं उठोनि गेले ॥ ४ ॥
मार्गी बहुमाल भेटले । तेथें मन नाहीं गुंतलें ॥ ५ ॥
एका विनवी जनार्दना । ऐसें असतां भय कोणा! ॥ ६ ॥

## २ सुविचारमाला.

प्रापचीं ममता कधीं धरूं नको, लोभांत गुंतूं नको ।
लोकीं तूं खळ दुष्ट नष्ट, भलत्या संगांत बैसूं नको ॥
कांहीं कर्म करूं नको, गुरुमहापंथासि मोडूं नको ।
जो कोणी भवदुःख सर्व निरसी तो देव सोडूं नको ॥ १ ॥

१ मृगाच्या आवडीनें जडभरत कसा गुंतला तें भागवतांत सांगितलें आहे. ममतेपाशीं असें मरण'—एकनाथ. २ 'लोभमूलानि पापानि' ३ सकाम कर्म करूं नको, कर्तेपणाचा अभिमान अंगीं घाजूं देऊं नकोस.

संसारीं असतां प्रवाहपतितद्वंद्वांसि त्रासूं नको ।
खेदाखेद मनांत आणुनि वनीं जाणें विचारूं नको ॥
कर्णीं दुष्ट कठोर शब्द पडती तें दुःख मानूं नको ।
भोगें दुःखसुखादि सारुनि निजानंदास भंग नको ॥ २ ॥
लाभीं हर्ष नको, विषादहि नको, निंदा प्रशमा नको ।
हानीचा मनिं शोक तूं धरुं नको, देहीं अहंता नको ॥
प्राणाचें इतिकृत्य तें स्मरुं नको, माझें तुझें हें नको ।
आप्तासी ममता नको. गुरुपरब्रह्मासि सोडूं नको ॥ ३ ॥
प्रारब्धीं सुखभोगयोग नसतां तें दैन्य मानूं नको ।
इंद्राची बहु संपदा गणुं नको, क्षुद्रार्थ वाछूं नको ॥
देहाचें कृतकर्मदुःख अपुलें कोणास सांगूं नको ।
भूलोकांत महाप्रसंग पडतां तूं सत्व सोडूं नको ॥ ४ ॥
मायामोह नको, सुसंग असतां सोडूनि जाऊं नको, ।
चिंताशोक नको, परार्थ करितां लोकास लाजूं नको, ॥
वर्मोच्चार नको, जगांत बसतां गोष्टी भवाच्या नको, ।
चित्तीं राग नको अनावर, खरें वैराग्य सोडूं नको, ॥ ५ ॥
नाचाचार नको, कुकर्म करणें हे क्षुद्रबुद्धी नको ।
मायाकल्पित वित्तवाजिकारी हे भोगार्थ वाछूं नको, ॥

१ सुखदुःखें भोगून संपीव. समर्थांनी हात घोंगडींत घालून ठेविले व रंगनाथ गेल्यावर ते पुनः कुडकुडूं लागले त्याचें बीज हेंच आहे. कर्मफळ भोगल्याशिवाय सुटत नाहीं. भोगानंतर त्याग. २ ते संसारांत ज्यास्त अडकवितात !

कायक्लेश नको, जनीं मूढ अशा संगांत बैसूं नको, ।
'जेथें जाउनि येत ना मुनि कदा तें धाम' सोडूं नको ! ॥६॥

—नारायणबोवा.

## ३ श्रीसमर्थकृत मनास बोध.

मना ! सज्जना ! भक्तिपंथेंचि जावें । तरी देव तो पाविजेतो स्वभावें ॥
जनीं निंद्य तें सर्व सोडूनि द्यावें । जनीं वंद्य तें सर्वभावें करावें ॥१
मना वासना दुष्ट कामा नये रे । मना सर्वथा पापबुद्धी नको रे ।
मना सर्वथा नीति सोडूं नको हो । मना अंतरीं सारवीचार राहो २
नको रे मना क्रोध हा खेदकारी । नको रे मना काम नानाविकारी ।
नको रे मना सर्वथा अंगिकारू । नको रे मना मत्सरू दंभभारू ३
मना श्रेष्ठ धारिष्ट जीवीं धरावें । मना बोलणें नीच सोशीत जावें ।
स्वयें सर्वदा नम्रवाचें वदावें । मना सर्व लोकांसि रे नीववावें ॥४॥
देह त्यागितां कीर्ति मागें उरावी । मना सज्जना हेचि क्रिया करावी
मना चंदनाचे परी त्वां झिजावें । परी अंतरीं सज्जना नीववावें ५
सदा सर्वदा प्रीति रामीं धरावी । दुःखाची स्वयें सांडि जीवीं करावी ।
देहदुःख तें सूख मानीत जावें । विवेकें सदा स्वस्वरूपीं भजावें ६

१ 'यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम' २ माया असार व ब्रह्म सार; त्या ब्रह्माचें चिंतन. ३ नित्य. ४ चित्तांतून ५ त्याग.

जगीं सर्वसुखी असा कोण आहे। विचारी[1] मना तूंचि शोधूनि पाहें।
मना त्वांचि रे पूर्वसंचीत केलें। तयासारिखें भोगणें प्राप्त झालें ७
मना मानसी दुःख आणूं नको रे। मना सर्वथा शोकचिंता नको रे।
विवेकें देहबुद्धि सोडूनि द्यावी। विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी ८
मरे एक त्याचा दुजा शोक वाहे। अकस्मात तोही पुढें जात आहे।
पुरेना जनीं लोभरे क्षोभ होतो। म्हणोनी जनीं मागुता जन्म घेतो ९
मना मानसीं व्यर्थ चिंता वहाते। अकस्मात होणार होवोनि जातें।
घडे भोगणें सर्वही कर्मयोगें। मतीमंद तो खेद मानी वियोगें १०
मना वासना चूकवी येरझारा[2]। मना कामना सोडवीं द्रव्यदारा।
मना यातना थोर हे गर्भवासी। मना सज्जना भेटवी राघवासी ११
सदा सर्वदा देव सन्नीध आहे। कृपाळूपणें अल्प धारिष्ट पाहे।
सुखानंद आनंद कैवल्यदानी। नुपेक्षी कदा राम दासाभिमानी १२
मना रे जनीं मौनमुद्रा धरावी। कथा आदरें राघवाची करावी।
नसे राम तें धाम सोडोनि द्यावें। सुखालागिं आरण्य सेवीत जावें १३
सदा देवकाजीं झिजे देह ज्याचा। सदा रामनामें वदे नित्य वाचा।
स्वधर्मेचि चाले सदा उत्तमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमा[3]चा १४

---

१ विचारशील मना! किंवा मना! विचारी म्ह० विचार कर. अथवा विचारी म्ह० विवेकी, नित्यानित्यविवेक करणारा मात्र सुखी असतो. २ 'पुनरपि जननं पुनरपि मरणं' या फेऱ्या. ३ क्षर व अक्षर यांहून श्रेष्ठ जो पुरुषोत्तम त्याचा. 'उत्तमः पुरुषस्त्वन्यः परमात्मेत्युदाहृतः' (गीता अ. १५)

सदा बोलण्यासारिखें चालताहे। अनेकीं सदा एक देवासि पाहे।
सगूर्णी भजे लेश नाहीं भ्रमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा १५
क्रमी वेळ जो तत्वचिंतानुवादें। न लिंपे कदा दंभवादें विवादें।
करी सूखसंवाद जो ऊगमाचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा १६
दिनाचा दयाळु मनाचा मवाळू। स्नेहाळू कृपाळू जगीं दासपाळू।
जया अंतरीं क्रोधसंताप कैचा। जगीं धन्य तो दास सर्वोत्तमाचा १७
न वेंचे कदा ग्रंथिचा अर्थ कांहीं। मुखें नाम उच्चारितां कष्ट नाहीं।
महा घोर ससारशत्रु जिणावा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा १८
नव्हे कर्म ना धर्म ना योग कांहीं। नव्हे भोग ना त्याग ना सांग कांहीं।
म्हणे दास विश्वास नामीं धरावा। प्रभाते मनीं राम चिंतीत जावा ॥
बहू चांगलें नाम या राघवाचें। अती साजिरे स्वल्प सोपें फुकाचें।
करी मूळ निर्मूळ घेतां भवाचें। जिवा मानवा हेंचि कैवल्य साचें २०
हरीकीर्तनीं प्रीति भावें धरावी। देहबुद्धि नीरूपणीं वीसरावी।
परद्रव्य आणीक कांता परावी। यदर्थीं स्वयें सांड जीवीं करावी २१
विवेकें क्रिया आपुली पालटावी। अती आदरें शुद्ध क्रीया धरावी।
जगीं बोलण्यासारिखें चाल बापा। मना कल्पना सोड संसारतापा २२
बरी स्नानसंध्या करीं एकनिष्ठा। विवेकें मना आवरीं स्थानभ्रष्टा।
दया सर्वभूतीं जया मानवाला। सदा प्रेमळू भक्तिभावें निवाला २३

---

१ आत्मस्वरूपाचा, आदितत्वाचा. २ गांठीचा पैसा. 'नाम घेतां नव्हे मोक्ष'—तुकाराम. ३ मोक्ष, ज्ञान.

टे वाद संवाद तेथें करावा। विवेकें अहंभाव हा पालटावा।
नीं बोलण्यासारिखें आचरावें। क्रियापालटें भक्तिपंथेंचि जावें २४
ाकाचें मुखीं बोलता काय वेंचे। दिसंदीस अभ्यंतरीं गर्व सांचे।
क्रियेवीण वाचाळता व्यर्थ आहे। विचारीं मना तूंचि शोधोनि पाहे २५
ागी धन्य तो राममुखीं निवाला। कथा ऐकता सर्व तल्लीन झाला।
हंभावना रामबोधें उडाली। मनोवासना रामरूपीं विरोली २६
वेचारूनि बोल विवंचूनि चाले। तयाचेनि संतप्त तेही निवाले।
ं शोधिल्यावीण बोलों नये हो। जनीं बोलणें शुद्ध नेमस्त राहो २७
ासे गर्व अंगीं सदा वीतरागी। क्षमाशांतिभोगी दयादक्ष योगी।
ामे लोभ ना क्षोभ ना दैन्यवाणा। अशा लक्षणीं जाणिजे योगिराणा २८
दिसे लोचनीं तें नसे कल्पकोडी। अकस्मात आकारलें काळ मोडी।
पुढे सर्व जाईल कांहीं न राहे। मना संत आनंत शोधोनि पाहे २९
जेणें मक्षिका भक्षिली जाणिवेची। तया भोजनाची रुचि प्राप्त कैची।
अहंभाव ज्या मानसीचा विरेना। तया ज्ञान हें अन्न पोटीं जिरेना ३०
अहंतागुणें सर्वही दुःख होतें। मुखें बोलिलें ज्ञान तें व्यर्थ जातें।
सुखें राहता सर्वही सुख आहे। अहंतागुणें तूंचि शोधोनि पाहे ३१
अहंतागुणें नीति सांडी विवेकी। अनीतीबळें श्लाघ्यता सर्व लोकीं।
परी अंतरीं सर्वही साक्ष येते। प्रमाणांतरीं बुद्धि सांडोनि जाते ३२

---

१ लवण जलांत, तशी विरघळून गेली. २ शाश्वत, नित्य. ३ नामरूपास आलेलें. ४ विरुद्ध पक्षाचीं प्रमाणें पुढें आलीं कीं विवेक नष्ट होतो.

देहबुद्धिचा निश्चयो दृढ झाला । देहातीत तें हीत सांडीत गेला ।
देहबुद्धि ते आत्मबुद्धि करावी । सदा संगती सज्जनाची धरावी ३३

देहबुद्धि ते स्वामिबोधें त्यजावी । विवेकें तया वस्तुची भेट घ्यावी ।
तदाकार हे वृत्ति नाहीं स्वभावें । म्हणोनी सदा तेंचि शोधीत जावें ३४

तिन्ही लोक जेथूनि निर्माण झाले । तया देवरायासि कोणी न बोले ।
जगीं थोरला देव तो चोरिलासे । गुरूवीण तो सर्वथाही न दीसे ३५

मनीहूनिया टाकिला सर्व हेवा । सदा सर्वदा आचरी नीच सेवा ।
गुरूचे घरीं झाडितो सारवीतो । मला तो गमे भूतळीचा रवी तो ३६

करी वृत्ति जो संत तो संत जाणा । दुराशागुणें जो नव्हे दैन्यवाणा ।
उपाधी देहबुद्धितें वाढवीतो । परी सज्जना केवि बाधूं शके तो ३७

न जाये जपासी न जाये तपासी । न जायेचि काशी न जाये गयेसी ।
गुरूचिंतनेवीण कोठें न जाये । त्रिकाळीं सदा पाय तुझेचि पाहे ३८

मना गूज रे तुजला प्राप्त झालें । परी अंतरीं पाहिजे यत्न केलें ।
सदा श्रवणें पाविजे निश्चयासी । धरीं संगती सज्जनीं धन्य होसी ३९

१ मी देह नव्हे तर आत्मा आहे असा निश्चय करावा. २ ब्रह्मा, विष्णु व महेश याचाही उत्पत्तिलय करणारा मुख्य परमात्मा. ३ शाश्वत, स्थिर, ध्रुव ४ उपाधी शब्द येथे पुल्लिंगी आहे. ५ गुह्य, रहस्य.

# ४ गृहस्थधर्म.

देनेकू अन्नपान लेनेकू हरिनाम ।
तरनेकू लीनता डुबनेकू अभिमान ॥

कबीर–

“ तुम्हां वर्णविशेषवशें[1] । आम्हीं हा स्वधर्म विहिला[2] असे ।
यातें उपासा[3] मग अपैसे[4] । पुरती काम ॥ १ ॥
अहेतुकें चित्तें । अनुष्ठा[5] पा यातें ।
पतिव्रता पतीतें । जियापरी ॥ २ ॥
देखा विहितक्रिया[6]विधि । निर्हेतुका[7]बुद्धि ।
जो असतिये समृद्धि । विनियोग करी ॥ ३ ॥
गुरु[8] गोत्र अग्नि पूजी । अवसरीं भजे द्विजीं ।
निमित्तादिकीं यजी । पितरोद्देशें ॥ ४ ॥

१ ब्राह्मण, क्षात्रय, वैश्य व शूद्र ह्या चार वर्णाप्रमाणें. २ नियमित करून दिला. ३ आचरा. ४ अपाप. ५ ज्या एकनिष्ठपणानें. ६ वेद-शास्त्रांनीं सांगितल्याप्रमाणें. ७ निष्कामबुद्धीनें. ८ गुरु, गोत्र, अग्नि, द्विज व पितर यांची पूजा व संतोष हाच खरा यज्ञ. देव, ऋषि, पितृ, भूत, ज्ञाति, बंधु व विभागार्ह लोक यांच्यांत आपला द्रव्यांश विभागल्याशिवाय केवळ इन्द्रिय-तृप्त्यर्थ त्यांचा उपभोग घेतल्यास प्राणी अधोगतीस जातो असें भागवतांत ( स्कंध ११–२३–२४) ह्मटलें आहे. पंचमहायज्ञ ह्मणजे ब्रह्मयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, भूतयज्ञ व मनुष्ययज्ञ हे गृहस्थानें केलेच पाहिजेत.“ अध्यापनं ब्रह्मयज्ञो पितृयज्ञस्तु तर्पणम् । होमो दैवो बलिर्भौतो नृयज्ञोऽतिथिपूजनम्. ” हे ज्या घरीं होत नाहींत त्या घरचें अन्न अपवित्र होय. देवाला दिल्याशिवाय खातो तो ‘स्तेन एव सः’

या यज्ञक्रिया उचिता । यज्ञेशीं हवन करितां ।
हुतशेष स्वभावता । उरे जें जें ॥ ५ ॥

तें सुखें आपुले घरीं । कुटुंबेसीं भोजन करी ।
कीं भोग्यचि तें निवारी । कल्मषातें ॥ ६ ॥

म्हणोनि स्वधर्में जें अर्जे । तें स्वधर्मेंचि विनियोगिजे ।
मग उरे तें भोगिजे । संतोषेसीं ॥ ७ ॥

इंद्रियरुचीसारिखे । करविती पाक निके ।
ते पापिये पातकें । सेविती जाण ॥ ८ ॥

हें संपत्तिजात आघवें । हवनद्रव्य मानावें ।
मग स्वधर्मयज्ञें अर्पावें । आदिपुरुषीं ॥ ९ ॥

निर्‍हां यज्ञभाविती मुर्ग । जे हें संपत्ति दिधली पुरी ।
तया स्वधर्मी सर्वेश्वरीं । न भजल जो ॥ १० ॥

अग्निमुखीं हवन । न करील देवतापूजन ।
प्राप्तवेळ भजन । ब्राह्मणाचें ॥ ११ ॥

विमुख होईल गुरुभक्ति । आदर न करील अतिथी ।
संतोष नेदील ज्ञाति । आपुलिये ॥ १२ ॥

ऐसा स्वधर्मक्रियारहित । आथिलपणें गर्वित ।
केवळ भोगासक्त । होईल जो ॥ १३ ॥

---

१ यज्ञनारायणाला अर्पण करून. २ यज्ञशिष्ट जें तें पापनिवारक आहे. ३ आपली सर्व संपत्ति हवनद्रव्य मानावें. ४ यज्ञतृप्त देवांनी. ५ संपन्नतेमुळें चढलेला.

तया मग अपावो थोर आहे । जेणें तें हातिचें सकळ जाये ।
देखा प्राप्तेंही न लहे । भोग भोगूं ॥ १४ ॥
ह्मणउनि स्वधर्म जो सांडील । तयातें काळ दंडील ।
चोर ह्मणूनि हरील । सर्वस्व तयाचें ॥ १५ ॥
तेथ निजवृत्ति जेथ सांडे । तेथ स्वतंत्रते वस्ती न घडे ।
आइका प्रजाहो फुडे " । विरंची ह्मणे ॥ १६ ॥

ज्ञानेश्वरी अ० ३.

**पूजेनंतर तीर्थोदक घेतांना श्रद्धेनें ह्मणायचे मंत्र.**

अकालमृत्युहरणं सर्वव्याधिविनाशनम् ।
विष्णुपादोदकं तीर्थं जठरे धारयाम्यहम् ॥ १ ॥
शरीरे जर्जरीभूते व्याधिग्रस्ते कलेवरे ।
औषधं जान्हवीतोयं वैद्यो नारायणो हरिः ॥ २ ॥

**भोजनसमयीं ठेवायची भावना.**

ब्रह्मार्पणं ब्रह्महविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ।
ब्रह्मैव तेन गंतव्यं ब्रह्मकर्मसमाधिना ॥ १ ॥
हरिर्दाता हरिर्भोक्ता हरिरन्नं प्रजापतिः ।
हरिर्विप्रशरीरस्तु भुंक्ते भोजयते हरिः ॥ २ ॥
एको विष्णुर्महद्भूतं पृथग्भूतान्यनेकशः ।
त्रीन् लोकान्व्याप्य भूतात्मा भुंक्ते भोजयते हरिः ॥ ३ ॥

१ अपाय, दुःख. २ प्राप्त भोगही पचत नाहींत. ३ स्वधर्म. ' सकळधर्मांमध्यें धर्म । स्वरूपीं राहणें हा स्वधर्म '–दासबोध. ४ मायाधीनता येते. ५ निश्चयानें.

( १० ) दैवास्तव पाळण । जो चिंतीना देहभरण ।
तो महायोगी जाण । दैवयोगें ॥

( ११ ) जयाचें ऐहिक धड नाहीं । तयाचे परत्र पुससी काई ॥

( १२ ) शून्य जैसें गृह । कां चैतन्येंवीण देह । तैसें जीवित तें संमोह । ज्ञानहीन ॥

( १३ ) म्हणोनि कल्पना जे सांडे । तेंचि गा संन्यास घडे ॥

( १४ ) जैसा [1]किडाळाचा दोष जाये । तरी पंधरें तेंचि होये ।
तैसें जीवा ब्रह्मत्व आहे । संकल्पलोपीं ॥

( १५ ) कां जे मार्गामार्ग देखावे । साचलटिकें वोळखावे ।
हिताहित जाणावें । हिताचिलागीं ॥

( १६ ) म्हणोनि थोरपण [2]पऱ्हां सांडिजे । एथ व्युत्पत्ति आघवी विसरिजे ॥
जे जगा धाकुटें होइजे । तें जवळिक माझी ॥

( १७ ) तैसें उत्तमत्व तेंचि तरे । तेंचि सर्वज्ञता सरे ।
जे मनोबुद्धि भरे । माझेनि प्रेमें ॥

( १८ ) म्हणोनि भक्ति गा एथ सरे । जाति अप्रमाण ॥

( १९ ) मी कवण पां [3]केतुला । कवणाचा कें जाहला ।
या [4]निरुती करितां बोला । कल्प गेले ॥

( २० ) विषयविषाचा [5]पडिपाडु । गोड परमार्थ वाटे कडु ।
कडु विषय तो गोडु । जीवासी जाहला ॥

( २१ ) नवल अहंकाराची गोठी । विशेषें नलगे अज्ञानापाठीं ।
सज्ञानाचे झोंबे कंठीं । नाना संकटीं नाचवी ॥

( २२ ) येरवी तरी पांडुसुता । अंतर शुद्ध नसतां ।
बाहेरी कर्म तो सर्वथा । विटंबु गा ॥

( २३ ) नामरूपसंबंध । जातिक्रियाभेद । हा आकारासीच प्रवाद ।
[6]वस्तूसि नाहीं ॥

१ हिणकस सोनें. २ पलिकडे, दूर. ३ केवढा. ४ प्राप्ती. ५ पराक्रम. ६ चिद्धन परमात्मस्वरूपास.

(२४) पैं शून्य जें दावावें जाहलें । तें बिंदुलें एक केलें ।
तैसें अद्वैत सांगावें बोलें । तें द्वैत कीजे ॥

(२५) तैसा चित्तीं अहंतें ठावो । आणि जिभे सकलशास्त्रांचा सरावो ।
ऐसेनि कोडी एक जन्म जावो । परी न पविजे मातें ॥

(२६) तैसा स्वरूपाचिया [1]प्रसरा । लागीं प्राणेंद्रियशरीरां ।
आटणी करणें जें वीरा । तेंचि तप ॥

(२७) शास्त्र ह्मणेल जें सांडावें । तें राज्यही तृण मानावें ।
जें घेववी तें न ह्मणावें । विषही विरु[2] ॥

(२८) पैं अहितापासूनि काढितां । हित देऊनि वाढवितां ।
नाहीं पुत्रापरौतां । साउला जगा ॥

(२९) तैसा श्रीगुरु प्रसन्न होये । शिष्य विद्याही कीर[3] लाहे ।
परी ते फळे संप्रदायें । उपासिलिया ॥

## २ तुकाराम.

(३०) असाध्य ते साध्य करितां सायास । कारण अभ्यास तुका ह्मणे ॥

(३१) देवभक्तपण । तुका ह्मणे नाहीं भिन्न[4] ॥

(३२) विधीनें सेवन । विषयत्यागातें [5]समान ॥

(३३) नलगे हा लौकिक साधावा वेव्हार । घ्यावें वनांतर भस्म दंड ॥

(३४) सागर पाहतां जवापाडें । दुरी पर्वताएवढें ॥

(३५) न फळे उत्तर । नाहीं स्वामी जों सादर[6] ॥

(३६) करावी ते पूजा मनेंचि उत्तम । लौकिकाचें काम काय असे ॥

(३७) अवघा एकाचीच वीण । तेथें कैचें भिन्नाभिन्न ॥

(३८) वैष्णव[7] तो जया । अवघी देवावरी माया ॥

१ प्राप्ती. २ विरुद्ध. ३ निश्चयेंकरून, ४ 'जीवो ब्रह्मैव नापरः' ५. यथाशास्त्र विषयसेवन केलें असतां सिद्धिभुक्ति व मोक्ष मिळतात. ६ परमात्मा जोंवर बोलला नाहीं तोंवर वाणीला अमोघत्व नाहीं. ७ भक्त.

( ३९ ) तुझें आहे तुजपाशीं । परि तूं जागा चुकलासी ॥
चिवडूनियां नासी । तुझ्या [1]घरच्यांनी केली ॥

( ४० ) विश्वासाची धन्य जाती । तेथें वस्ती देवाची ॥ १ ॥
तुका ह्मणे भोळीयाचा । देव साचा अंकित ॥ २ ॥

( ४१ ) देव सारावे परते । संत पूजावे आरते ॥

( ४२ ) नलगे सांडावा आश्रम । उपजले कुळांचे धर्म ॥
आणिक न करावे श्रम । पुरे एक नाम विटोबाचें ॥

( ४३ ) भेद नाहीं सर्वात्मना । नारायणा तुज मज ॥

( ४४ ) तुज वर्णी ऐसा तुजविण नाहीं । दुजा कोणी तिहीं त्रिभुवनीं ॥

( ४५ ) तुका म्हणे करूनि दावी । त्याचे पाय माझे जीवीं ॥

( ४६ ) भाव तैसें फळ । न चले देवापाशीं बळ ॥

( ४७ ) वर्णाश्रम करिसी चोख । तरि तूं पावसी उत्तम लोक ॥

( ४८ ) द्रव्याचिया मागे कळिकाळाचा लाग । म्हणोनिया संग खोटा त्याचा ॥

( ४९ ) विटाळ तो परद्रव्य परनारी । येथुनी जो दुरी तो सोवळा ॥

( ५० ) साधुसंत येती घरा । तोचि दिवाळी दसरा ॥

( ५१ ) तुका म्हणे भाव असतां नसतां । सायास करितां वायां न वजे ॥

( ५२ ) देव जोडे ते करावे अधर्म । अंतरे तें कर्म नाचरावे ॥

( ५३ ) पोटापुरतें काम । परी अगत्य तो राम ॥

( ५४ ) आला भागासी तो करी वेवसाय । परी राहो भाव तुझ्या पायीं ॥

( ५५ ) दया क्षमा शांती । तेथें देवाची वसती ॥

( ५६ ) तुका म्हणे कांहीं नाहीं नेमावीण । मोकळा[2] तो सीण दुःख पावे ॥

( ५७ ) आशाबद्ध तो जगाचा दास । पूज्य तो उदास सर्वजनां ॥

( ५८ ) सत्यसंकल्पाचा दाता नारायण । सर्व करी पूर्ण मनोरथ ॥

( ५९ ) तुका म्हणे हरिच्या दासा । शुभकाळ दाही दिशा ॥

---

१ शरीरांतल्या कामक्रोधादि विकारांनीं. २ नियमहीन, स्वच्छंदी.

( ६० ) मन हें निश्चळ झालें एक ठायीं । तयां उणें काई निजसुखा ॥
( ६१ ) ब्रह्मरस करूं भोजनपंगती । संताचे संगती सर्वकाळ ॥
( ६२ ) आमुचा स्वदेश । भुवनत्रयामध्यें वास ॥
( ६३ ) चित्त शुद्ध जरी शत्रु मित्र होती । व्याघ्र हे न खाती सर्प तया ॥
( ६४ ) कासया गुणदोष पाहों आणिकांचे । मज काय त्यांचें उणें असे ॥
( ६५ ) पवित्र तो देह वाणी पुण्यवंत । जो वदे अच्युत सर्वकाळ ॥
( ६६ ) प्रेम अमृताची धार । वाहे देवा हा समार ॥
( ६७ ) भक्तीच्या उत्कर्षे । नाहीं मुक्तीचें ते पिस ॥
( ६८ ) वासनेचा [1]बुंथा । तेथें कैचा ब्रह्मस्थिति ॥
( ६९ ) निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥
( ७० ) नरांचें जन्मा यावें । दास विठ्ठलाचें व्हावें ॥
नाहीं तरी काय थोडीं । श्वान सूकरें बापुडीं ॥
( ७१ ) पवित्र तें अन्न । हरिचिंतनीं भोजन ॥
( ७२ ) म्हणे देवासी पाषाण । तुका म्हणे भावहीन ॥
( ७३ ) ओलें मातीचा भरंवसा । काय मानिसी माणसा ॥
( ७४ ) स्त्रिया धन बहु खोटें । नागविले मोठमोठे ॥
( ७५ ) हरिहरां भेद । नाहीं, नका करूं वाद ॥
( ७६ ) पवित्र तें कुळ पावन तो देश । जेथें हरिचे दास जन्म घेती ॥
( ७७ ) बोले तैसा चाले । त्याची वंदावीं पाउलें ॥
( ७८ ) नाना मतांतरें शब्दांची व्युत्पत्ती । पाठांतरें होती वाचाळ ते ॥
( ७९ ) सांपडे हा देव भाविकांचें हातीं । शाहाणे मरती तरी नाहीं ॥
( ८० ) करावे सायास आपुल्या हिताचे । तेथें आलियाचें मनुष्यपण ॥
( ८१ ) मुखीं नाम हातीं मोक्ष । ऐसी [2]साक्ष बहुतांची ॥
( ८२ ) दाता नारायण । स्वयें भोगिता आपण ॥

---

१ घुंगट, वेष्टन. २ प्रतीति.

( ८३ ) पवित्र सोवळीं । तींच एक भूमंडळीं ॥
ज्यांचा आवडता देव । अखंडीत प्रेमभाव ॥

( ८४ ) तुका म्हणे थोडें आहे । आली उर्मी साहुनि राहे ! ॥

( ८५ ) दुजें खंडे तरी उरला तो अवघा हरी ।
आपणाबाहेरी नलगे ठाव धुंडावा ॥ १ ॥

## ( रामदास ).

( ८६ ) असो भगवत्प्राप्तीर्वाण । करी संसाराचा शीण ।
त्या मूर्खाचे मुखावलोकन । करूंच नये ॥ १ ॥

( ८७ ) पुत्र कलत्र आणि दारा । इतुकाचि मानूनियां थारा ।
विसरोनि गेला ईश्वरा । तो एक मूर्ख ॥ २ ॥

( ८८ ) नरदेहाचे उचित । कांहीं करावे आत्महित ।
यथानुशक्त्या चित्तवित्त । सर्वोत्तमीं लावावे ॥ ३ ॥

( ८९ ) संसारदुःख विसरवी । भक्तिमार्ग विमल दावी ।
भजनक्रिया जो उपजवी । तो सत्वगुण ॥ ४ ॥

( ९० ) मूर्खामाजी परम मूर्ख । जो संसारी मानी सुख ।
या संसारदुःखाऐवढें दुःख । आणीक नाहीं ॥ ५ ॥

( ९१ ) जो अन्न देतो उदरासी । शरीर विकावे लागे त्यासी ।
जेणें घातलें जन्मासी । त्यासि कैसे विसरावे ॥ ६ ॥

( ९२ ) जो संसारदुःखें दुखवला । जो त्रिविधतापे पोळला ।
तोचि अधिकारी झाला । परमार्थासी ॥ ७ ॥

( ९३ ) सद्‌गुरुहूनि देव मोठा । जयास वाटे तो शिष्य करंटा ॥

( ९४ ) संसारसंगें दुःख न जाहले । ऐसें देखिले ना ऐकिले ॥

( ९५ ) छपन्न भाषा तितुके ग्रंथ । आदिकरूनि वेदांत ।
या इतुक्यांचा गहनार्थ । एकचि असे ॥ ८ ॥

( ९६ ) जो जाणेल भगवंत । तया नांव बोलिजे संत ।
जो शाश्वत आणि अशाश्वत । निवाडा करी ॥ ९ ॥

( ९७ ) पोट भरायाची विद्या । तियेसि ह्मणों नये सद्विद्या ।
सर्वव्यापक वस्तु सद्या । पाविजे तें ज्ञान ॥ १० ॥

( ९८ ) संसारत्याग न करितां । प्रपंचउपाधी न सांडतां ।
जनामध्यें सार्थकता । विचारेंचि होय ॥ ११ ॥

( ९९ ) गुप्त तेंचि प्रकटवावें । असाध्य तेंचि साधावें ।
¹कानडेंचि अभ्यासावें । निरंतर ॥ १२ ॥

( १०० ) देहबुद्धीच्या अंतीं । सकळांसि एकच प्राप्ती ॥

( १०१ ) प्रीतीचें लक्षण ऐसें । अंतरीं उठे अनायासें ।
पाणी पाणवाटे जैसें । आपणचि धांवे ॥ १३ ॥

( १०२ ) परोपकार साधनेंवीण । ह्मणों नये तें श्रवण ।
जेथें नाहीं आत्मज्ञान । तया नांव कर्मणा² ॥ १४ ॥

( १०३ ) साडील सगुण भजनासी । तो ज्ञाता परी अपेशी ।
म्हणोनि सगुण भजनासी । सांडूंचि नये ॥ १५ ॥

( १०४ ) एका मर्दपणाचें लक्षण । रिकामा जाऊं नेदी क्षण ॥

( १०५ ) अरे हें पाहिलेंचि पाहावें । विवरलेंचि मागुती विवरावें ।
वाचिलेंचि वाचावें । पुनः पुन्हां ॥ १६ ॥

( १०६ ) अखंड एकांत सेवावा । अभ्यासचि करीत जावा ।
काळ सार्थकचि करावा । जनामहित ॥ १७ ॥

( १०७ ) प्रपंचीं जो सावधान । तोच परमार्थ करील जाण ।
प्रपंचीं जो अप्रमाण । तो परमार्थी खोटा ॥ १८ ॥

( १०८ ) वैराग्यापरतें नाहीं भाग्य । वैराग्य नाहीं तें अभाग्य ॥

( १०९ ) वेडे करावे शहाणे । तरीच जिणें श्लाघ्यवाणें ।

( ११० ) विभक्तपणें रहावें । आणि भक्तचि म्हणावें ।
हें अवघेंचि जाणावें । विलक्षण ॥ १९ ॥

---

१ कठिण. २ कालक्रमणा.

( १११ ) प्रपंचीं सुवर्ण । परमार्थी पंचीकरण ॥
( ११२ ) जिकडे जग तिकडे जगन्नायक ॥
( ११३ ) नित्यनेम दृढचित्तीं । तेणे शुद्ध चित्तवृत्ति ।
होवोनि भगवंतीं । मार्ग फुटे ॥
( ११४ ) पदार्थज्ञानाचा बडिवार । त्याहूनि थोर ईश्वर ।
( ११५ ) साधनेंवीण ब्रह्मज्ञान । तेण बुंड समाधान ।
अंगीं जडे देहाभिमान । वाचाळपणे ॥
( ११६ ) ज्ञान झाले भक्तजना । सांडूं नये उपासना ॥
( ११७ ) प्राणी संसारासी आला । तितुका मृत्युपंथे गेला ॥
( ११८ ) दुःखमूळ हा संसार । तयामध्ये भक्ति सार ॥
( ११९ ) जो जो प्रयत्न रामावीण । तो तो दुःखासी कारण ॥
( १२० ) गुण गातां भगवंताचे । तेचि जाणावे दैवाचे ॥
( १२१ ) ज्ञानावीण जी जी कळा । ती ती जाणावी अवकळा ॥
( १२२ ) हरिभक्तिवीण जाऊं नये क्षण । या नांव लक्षण सार्थकाचे ॥
( १२३ ) विधिने विषयां ध्यावें अविधी नसतां बरें ।
आश्रमी न्यायनीतीने प्रपंच करणे सुखे ॥
( १२४ ) जेथे बहु विचार । तेथे ईश्वरअवतार ।
मागे झाले थोर थोर । धक्के चपेटे सोसोनी ॥
( १२५ ) करूं नये गुणदोषउठाठेवी । विवेके लावावी बुद्धि मना ॥
( १२६ ) सामर्थ्य आहे चळवळीचे । जो जो करील त्याचें ।
परंतु आधीं भगवंताचें । अधिष्ठान पाहिजे ॥
( १२७ ) दया दान धर्म करावा स्वधर्म । चुकवावें वर्म संसाराचे ॥
( १२८ ) अंतरीचा देव अंतरी पहावा । मीपण हे देवा समर्पावे ॥
( १२९ ) प्रपंची तें भाग्य परमार्थी वैराग्य । दोन्ही यथायोग्य दोन्हीकडे ॥
( १३० ) **मुख्य समाधान आत्मनिवेदन । निर्गुणीं अनन्य होतां बरें ॥**